

# रॉबिन हुड

## आणि

# त्याचे रंगेल गडी

अनुवादक

**भा. रा. भागवत**






चि० लवीन्द भाक्कल भागवत ह्याला
त्याचा आवडता लॉबिन होड



शिंग वाजता। रॉबिनकरता।
शरवुड जंगल भंगेल।
गडी लोटतिल रंगेल॥

शेकडो वर्षांमागची गोष्ट. असे सांगतात की एक उमदा इंग्रज तरुण कर्जापायी बेजार झाला आणि सावकारांचा ससेमिरा चुकवण्यासाठी घोर अरण्यात शिरला.

तेथेच मग त्याने घर केले. त्याला आता कशाचीही काळजी नव्हती. रानात पक्षी आणि जनावरे – त्यांतही हरणे विशेष – वाटेल तितकी असत. त्यांची शिकार करावी आणि चैनीत राहावे. धनुष्यबाण घेऊन रानभर भटकावे. जेव्हा खुमखुम येईल, तेव्हा भेटेल त्याच्याशी दोन हात करावेत, त्याला लुटावे, हा त्याचा बाणा. राजाची खास हरणे मारायची नाहीत असा इंग्लंडचा कायदा होता, पण हा लहरी लुटारू तो कायदा धाब्यावर बसवी.

रॉबिन हुडचा गुन्हा असेल तर तो एवढाच होता. एरव्ही तो अतिशय दिलदार व शूर मर्द होता. अनाथ, अपंग, म्हातारे-कोतारे, बायका-मुले

व जखमी लोक ह्यांच्या तो कधी वाटेला जात नसे. श्रीमंतांचे धन लुटी आणि गरिबांना वाटी. हरणांची शिकार करणे हा गुन्हा असला तरी तसे करण्यात वाईट काहीच नव्हते. कारण त्या काळचे पुष्कळ कायदे जुलमी व दुष्टपणाचे होते. रॉबिन म्हणे, 'लोक अर्धपोटी राहातात आणि ह्यांनी चैनीसाठी हरणे पाळायची काय? ते काही नाही, आपण असला कायदा पाळणार नाही.'

कोणी म्हणतात, ह्या त्याच्या गुन्ह्यामुळेच त्याला शेवटी पळून जावे लागले आणि मग त्याने पुष्कळ लोक जमा करून आपली टोळी तयार केली.

ते काही असो. कोणत्या कारणाने रॉबिन हुड शरवुडचा वनवासी झाला, हे त्याचे त्याला माहीत. कारण त्याच्याबद्दल पुढे इतक्या दंतकथा पसरल्या, की त्यांतल्या खऱ्या-खोट्या निवडून काढणे कठीण आहे. इतकेच काय, पण रॉबिन हुड नावाचा इसम होता, की नाही तेसुद्धा सांगणे कठीण आहे.

पण आपल्याला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. एवढे खरे, की रॉबिनच्या अद्भुतरम्य गोष्टींनी इंग्लंडच्या लोकांना वेड लावून सोडले. रॉबिन हुडच्या पराक्रमावर शेकडो पोवाडे रचले गेले. रात्रीच्या वेळी शेकोटीभोवती नाचतनाचत ते पोवाडे म्हणताना तरुणांना मौज वाटे आणि मुले तर हसूननाचून मैदान डोक्यावर घेत. एक कोणीतरी शाहीर पोवड्यातली कडवी म्हणे आणि शेवटची घोळून म्हणायची ओळ सर्वच एकदम तारस्वरात ओरडून म्हणत!

त्या काळी इंग्लंडात नॉर्मन राजे राज्य करीत होते आणि काही लोकांच्या मते रॉबिन हुड एक सॅक्सन पुंड होता, म्हणून त्याचे राज्यकर्त्यांशी नेहमी खटके उडत. उलट कित्येकांच्या मते तो मूळचा नॉर्मन सरदार होता. पण त्याची सरदारकी त्याच्या हितशत्रूंनी बळकावली होती. जॉन राजा जुलमी होता आणि त्याचा मोठा भाऊ शूर रिचर्ड

युद्धावर गेला असताना इकडे प्रजेवर जुलूम करून जॉनने गादी उपटायचा बेत केला, तेव्हा रॉबिनने त्याच्याविरुद्ध बंड करून रिचर्डला मदत दिली, असाही एक इतिहास आहे आणि रॉबिन हुडवर जो सुंदर रंगीत चित्रपट निघाला आहे, त्यात ह्याच इतिहासाचा आधार घेतलेला आहे. पण मी मघाशी सांगितलेच, की खरेखोटे काही का असेना, एवढे निश्चित, की रॉबिन हुड, धाकला जॉन, चक्कीवाल्याचा मुलगा मच (मच म्हणजे खूपच!), संन्यासीबुवा टक, तांबडा वुइल आणि बाकीचे सारे रंगेल गडी हे दिलदार, शूर आणि जिवाला जीव देणारे वीर होते आणि आपल्याला नेहमी असेच दोस्त आवडत असतात नाही का?

रॉबिन हुडच्या पोवड्यांवरून अनेक गोष्टी तयार झाल्या. त्यापैकी मॅक् स्पॅडनने लिहिलेल्या गोष्टी त्यांतल्या त्यांत खऱ्या समजतात. हा अनुवाद जरा स्वैर आणि सैल हाताने केलेला असला तरी त्याला आधार मॅक स्पॅडनचाच आहे.

**भा. रा. भागवत**

धाकला जॉन

# १

ऐका ऐका सज्जन हो
सैनिक हो स्वातंत्र्याचे ।
पोवाडे वनवीराचे
शरवुडच्या रॉबिन हुडचे ॥

फार फार वर्षांपूर्वी इंग्लंड देशात हॅरी नावाचा राजा राज्य करीत असे. राजेसाहेबांना शिकारीचा भारी शौक होता. त्यांनी जंगलेच्या जंगले स्वतःसाठी राखून ठेवली होती आणि त्यात हरणांचे कळपच्या कळप सोडले होते. त्या हरणांची शिकार फक्त राजेसाहेबांनीच

मच्                    तांबडा वुइल                    संन्यासी टक

करायची. दुसऱ्या कोणी हरिण मारले, की त्याला फाशीची शिक्षा ठेवलेलीच. ह्या जंगलांची देखरेख करायला खास राखणदार नेमले होते आणि शहराच्या कोतवालासारखाच त्या राखणदारांचा बडा दर्जा असे!

अशाच राखीव जंगलांपैकी शरवुडच्या अरण्यात आपल्याला आता जायचे आहे. वेळ मोठी आल्हादकारक आहे. पूर्व दिशेला नुकतेच तांबडे फुटले आहे. झाडांच्या शेंड्यांशेंड्यांवरून सूर्याची कोवळी किरणे हळूच पसरत चालली आहेत. पाने फुले लकलक करीत आहेत. मध्येच अंधुक उजेड दिसतो आहे, तर मध्येच पुसट काळोख. ते उंच उंच वृक्ष पाहून एखाद्याला वाटावे, की जाळीदार बुरखे पांघरून ह्या गोषांतल्या स्त्रिया तर प्रार्थनेला आलेल्या नाहीत? पण तसे म्हणावे तर त्याच अरण्यात एका मोठ्या वृक्षाखाली चाललेला प्रकार ह्याला शोभेसा दिसत नाही. तिथे शिकाऱ्यांचा एक अड्डा बसलेला आहे. त्यांच्या गप्पा अगदी रंगात आलेल्या आहेत आणि नुसत्या गप्पाच नाहीत....

तो पाहा, त्यांच्यापैकी एकाने पिवळ्याधमक दारूचा प्याला उचलला आणि घटदिशी घशात ओतला. तो पाहा, दुसऱ्या एकाने ताज्या मांसाचा लालभडक तुकडा उचलला आणि कचाकच चावला. मिटक्या मारीत मेजवानी चालली होती त्यांची. पण इतक्यात त्यांच्यापैकी एकाचे लक्ष पलीकडच्या दरडीकडे गेले. त्याने आपल्या पुढाऱ्याला खुणावले आणि पुढाऱ्यानेही वळून तिकडे पाहिले.

एक उंच, धट्टाकट्टा, देखणा तरुण स्वतःशीच शीळ वाजवीत दरड चढून येत होता. त्याने अंगात हिरवा लांडा झगा घातलेला होता. त्याला कॉलर नि किनार मात्र लाल रंगाची होती. डोक्याला तांबड्या लाल मखमलीची टोपी होती आणि तिच्यात झगमग करणारे एक पीस मोठ्या ऐटीत खोवून दिले होते. पाठीवर बाणांनी खच्चून भरलेला भाता होता आणि खांद्याला धनुष्य अडकवलेले होते.

"अरेच्या! हा कोण?"

त्याला तिथे पाहून सर्वांनाच नवल वाटले. ते त्याला मुळीच ओळखत नव्हते. पण तो तरुण मात्र त्यांना ओळखत होता. त्या तरुणाचे नाव रॉब. शिकाऱ्यांच्या पुढाऱ्याला पाहून रॉब चांगलाच चमकला. मग त्याने दात ओठ चावले.

त्या माणसाला पाहून रॉबला संताप यावा हे अगदी साहजिक होते; कारण तो माणूस म्हणजे रॉबचा शत्रू होता.

शरवुडचे अरण्य राखण्याचे काम पूर्वी रॉबच्या बापाकडे होते. ह्यू फित्झूथ हे त्याचे नाव. त्याला खूप वर्षे झाली. त्याच्या हाताखाली रॉब तीर मारण्यात तरबेज झाला होता. शिकार म्हटली, की त्याला कोण आनंद होई! तिरकमठा घेऊन बापाबरोबर भटकण्यात त्याला मजा वाटे आणि याचे बाबा जेव्हा त्याला 'वुइल' नावाच्या कुरणावरच्या प्रसिद्ध पुंडाच्या गोष्टी सांगत, तेव्हा तो अगदी रंगून जाई. वुइलने जंगलच्या राखणदारांना कित्येक वर्षे चकवले होते आणि त्याने नि त्याच्या

साथीदारांनी मिळून राजाच्या खास हरणांना मारून त्यांचा फन्ना उडवला होता! वुइल कायद्याला जुमानीत नसे आणि कायद्यानेही वुइलला वाळीत टाकले होते. कोणीही उठावे, वुइलला पकडावे, ठार मारावे किंवा वाटेल ती शिक्षा करावी; त्याला राजेसाहेबांची हरकत नव्हती. त्यांनी वुइलला पुंड म्हणून जाहीर केले होते.

रॉबला वुइलचे पराक्रम ऐकून चेव चढे. त्याला वाटे आपणही असेच काही तरी करावे. रॉबच्या आईला मात्र हे आवडत नसे. रॉबची आई मोठ्या घराण्यातली होती. तिला वाटे आपल्या मुलाने कीर्ती मिळवून दरबारचे मानकरी व्हावे. ती रॉबला लिहावाचायला शिकवी, चांगला पोशाख कसा करायचा ते दाखवी. रॉब तिचे ऐके, पण त्याचे चित्त पुस्तकात नसे, कपड्यात नसे. धनुष्य आणि बाण हेच त्याचे दैवत! हातात तिरकमठा, की निघाला भामटा!

अगदी लहान असतानाच रॉबला दोन दोस्त मिळाले होते. एक म्हणजे त्याचा चुलतभाऊ वुइल गेमविल आणि दुसरी मेरियन फिझवॉल्टर. मेरियनचा बाप हंटिंग्डनचा सरदार होता. शरवुडच्या जंगलात जी उंच उंच झाडे होती; त्यांतल्या एका खूप उंच झाडाच्या शेंड्यावर चढले, की हंटिंग्डनचा किल्ला नजरेला पडे. हवेत उघाडी असली, की रॉब पुष्कळदा झाडावर चढे आणि रुमाल हलवून मेरियनला खूण करी आणि मग मेरियन त्याला भेटायला येई. कारण रॉबला किल्ल्यात जायची मुळीच सोय नव्हती. रॉबचा बाप आणि मेरियनचा बाप ह्यांचे अगदी हाडवैर – विळ्या-भोपळ्याइतके! कोणी सांगतात, की फिझवॉल्टर हा खरा हंटिंग्डनचा मालक नव्हताच मुळी. त्याचा खरा मालक होता ह्यू फित्झूथ – म्हणजे रॉबचे वडील. फिझवॉल्टरने म्हणे राजाचे कान फुंकले होते आणि काही तरी लटपटी करून फित्झूथची हकालपट्टी करून त्याचा किल्ला आपण उपटला होता.

पण रॉबला त्याची पर्वा नव्हती आणि मेरियनला पण पर्वा नव्हती. तो लोखंडी दारांचा भक्कम किल्ला त्यांना नको होता. हिरव्यागार गवतावरून आणि दाट सुंदर वनातून फिरायला मिळाले, की त्यांना बस्स होते. फुलांचा मधुर गंध, पक्ष्यांची गोड किलबिल आणि अफाट पसरलेली हिरवळ हीच त्यांची संपत्ती होती.

पण असे नेहमीच चालणारे नव्हते. त्यांचे लहानपण आनंदात निघून गेले आणि मग संकटांना सुरुवात झाली.

फिझवॉल्टर हा एकटाच रॉबचा शत्रू नव्हता. शरवुडच्या जंगला-शेजारी नॉटिंगहॅम नावाचे शहर होते. तिथला कोतवाल देखील रॉबला पाण्यात पाहात असे आणि राजेसाहेबांचा लठ्ठ उपाध्या हरफोर्डचा बिशप हा देखील रॉबच्या नावाने बोटे मोडीत असे!

हे तिघे शत्रू एक झाले. त्यांनी रॉबच्या वडिलांबद्दल राजाच्या मनात वाईट-साईट भरवून दिले. राजाने रॉबच्या वडिलांना राखणदाराच्या जागेवरून काढून टाकले, त्यांच्यावर राजद्रोहाचा खोटानाटा आरोप ठेवला आणि त्यांना तुरुंगात अडकवून टाकले. रॉब आणि त्याची आई ह्यांनाही एक रात्र अंधारकोठडीत ठेवले आणि मग सकाळी लाथा मारून 'जा आता वाटेल तिकडे' असे म्हणून हाकलून दिले.

त्या वेळी कमालीचा गारठा होता. रॉबला आणि त्याच्या आईला वणवण भटकावे लागले. त्यांना कोणी आसरा देईना; कारण सगळे राजाला भीत होते. मग रॉबच्या काकाला हे कळले. तेव्हा त्याने मात्र त्यांना आपल्या घरी राहायला बोलावले. पण थंडीच्या दिवसांत इतकी पायपीट करून रॉबची आई आधीच इतकी थकली होती, की ती फार दिवस जगली नाही.

रॉबची आई मेली आणि मग थोड्याच दिवसांत त्याचा बापही तुरुंगात मरण पावला. बिचाऱ्याला न्यायाधीशापुढे आपला बचाव करायला सुद्धा परवानगी दिली नाही.

काकाच्या घरी रॉबची दोन वर्षे कंटाळवाणी गेली. त्याचा मित्र वुइल शिक्षणासाठी शहरात गेलेला होता आणि मेरियनची नि त्याची गाठच पडत नव्हती. कारण तिची रॉबिनशी दोस्ती जमली आहे असे तिच्या बापाला कळल्याबरोबर त्याने मेरियनला राजवाड्यात पाठवून दिले होते. ती आता राणी एलिनॉरची मैत्रीण म्हणून ऐटीत राहात असे.

रॉबला एकट्यालाच तिरकमठा घेऊन भटकण्याचा कंटाळा आला. त्याच्या काकाने हे ओळखले आणि एक दिवस तो म्हणाला,

"रॉब, तुला एक संधी आली आहे बघ."

"कसली?"

"आपलं नेमबाजीत कौशल्य दाखवायची. नॉटिंगहॅम शहरात मोठी जत्रा भरायची आहे. जत्रेत तऱ्हेतऱ्हेचे खेळ आहेत. त्यांत तिरंदाजीच्या शर्यती पण आहेत आणि त्या बघायला कोण कोण येणार आहे, माहीत आहे?"

"कोण?"

"राणीसाहेबांची एक दोस्तीण....तुझी पण दोस्तीणच!"

"मेरियन?"

रॉबला ती बातमी ऐकून एवढा आनंद झाला, की नॉटिंगहॅमच्या जत्रेला जायचे त्याने तेव्हाच ठरवून टाकले. अजून जत्रेला चांगले पंधरा-वीस दिवस होते. पण दुसऱ्याच दिवशी भल्या पहाटे उठून रॉब घरून निघाला. त्याने बरोबर फक्त आपला धनुष्यबाण घेतला होता.

तो मोठ्या आनंदात शीळ घालीत चालला होता. पण त्याचा प्रवास इतक्या सुखासुखी व्हायचा नव्हता.

रॉब एक-दोन तास चालून गेला नाही, तोच त्याची शत्रूशी गाठ पडली. कशी ते आपण पाहिलेच आहे.

राखणदाराने जरा वेळ डोळे बारीक करून गवताची काडी चावीत रॉबकडे पाहिले. मग म्हणतो, "हा कोण आला बुवा नखरेल तिरंदाज?

काय रे बाळ, कुठे चाललास आपली धनुकली घेऊन? आणि पाठीवर काड्या पण घेतल्या आहेस वाटतं? नॉटिंगहॅमच्या जत्रेत काही विक्रम करायचा तर बेत नाही तुझा?''

ही कुचेष्टा ऐकून बाकीचे शिकारी खो खो करून हसले; पण रॉबचा चेहेरा रागाने लाल झाला.

त्याने झटक्याने उत्तर दिले, ''हे पाहा, माझं धनुष्य तुमच्याइतकंच भक्कम आहे आणि त्यातून सुटणारे बाण देखील सणसणीत नि सरळ जातात. तेव्हा मला तुम्ही धडे शिकवायचं कारण नाही.''

पुन्हा हशाचा एक कल्लोळ उठला. पण राखणदार मात्र हसला नाही. रॉबकडे पाहात तो रागारागाने म्हणाला, ''इतकी हुशारी कशाला करतोस? तुझ्यात धमक असेल तर दाखव आपलं कसब. तुला सांगतो त्या निशाणाला बरोबर बाण मारशील तर वीस पौंड हरायला आपण तयार आहो. पण जर का नेम चुकला तर तू हरलास असं समजायचं.''

''कबूल.'' रॉबने धनुष्याला एक तीर लावून दोरी ताणली सुद्धा.

''बोला....कुठे मारू?''

ते बसले होते तिथून सुमारे तीनशे फुटांवर एक पठार होते. पठारावरच्या हिरव्या गार कुरणात हरणांचा कळप चरत होता.

तिकडे बोट करून राखणदार जोरात म्हणाला, ''ते पाहिलंस? इतक्या दूर बाण मारायला सांगत नाही मी तुला. तुझे डोळेच फिरतील. त्याच्या निम्म्या अंतरापर्यंत जरी तुझा बाण पोचला तरी पैज तुझी!''

''कशाला....कशाला?'' असे म्हणत रॉबने धनुष्याची दोरी ताणीत आपला उजवा हात खांद्यापर्यंत नेला सुद्धा. ''त्या कळपाच्या म्होरक्याचा बळी घेतो पाहा माझ्या ह्या बाणाने! नाही घेतला तर ही गर्दन कापून तुमच्यापुढे ठेवतो.''

डोळ्याचे पाते लवते न लवते तो अचूक नेम धरून रॉबने तीर सोडला. तीर सूं सूं करीत गेला आणि कळपाच्या पुढच्याच भागी असलेल्या त्या धिप्पाड काळविटाच्या छातीत घुसला. बाकदार शिंगांच्या त्या सुंदर काळविटाने एक किंकाळी फोडून वर उडी मारली आणि मग तो जो खाली आदळला तो पुन्हा उठलाच नाही. हिरव्यागार गवतावर लाल गरम रक्ताचे थोरोळे झाले.



काही वेळ सर्वत्र शांतता होती. असे काही होईल असे कोणालाच वाटले नव्हते. ह्या चिमुरड्याच्या अंगात इतकी शक्ती नि हुशारी असेल अशी कोणाचीच कल्पना नव्हती.

थोड्या वेळाने सर्वजण ताळ्यावर आले आणि त्यांच्यात गुरगुर सुरू झाली. सर्वांत जास्त संताप आला तो राखणदाराला.

"गाढवा! काय केलंस तू हे?" तो ओरडला, "ती राजेसाहेबांची हरणं आहेत, माहीत आहे? पैजबीज विसर आता! गर्दनीच्या गप्पा मारतोस, पण ती तुझी गर्दन आता एवीतेवी छाटलीच जायची, समजलास?"

हे त्याचे बोलणे ऐकून रॉबचे रक्त सळसळले. "अरे जा रे!" तो तिथून निघून जाताना तिरस्काराने म्हणाला, "बकबक करणारं तुझं हे तोंड पुष्कळदा पाह्यलंय मी! माझ्या बाबांच्या जागेवर मिरवायला शरम नाही वाटत तुला?"

रॉबने हे बोलायला नको होते. पण तो बोलून चुकला. धनुष्यातून सुटलेला बाण परत थोडाच येतो? त्याने करायचे ते काम केलेच.

रॉब म्हणजे कोण ह्याची राखणदाराला ओळख पटली. तावातावाने उठून त्याने धनुष्याला बाण लावला आणि रॉबच्या अंगावर नेम धरला. पण गडबडीत त्याचा स्वतःचाच पाय निसरला आणि त्यामुळे नेम चुकून रॉबचे प्राण वाचले. तरी पण बाण अगदी रॉबच्या कानाला चाटून गेला.

रॉबनेही वेळ घालवला नाही. मोठ्याने हसून त्याने आपले धनुष्य सज्ज केले.

"वा रे तिरंदाज!" त्याने टोमणा मारला, "आता माझी धनुकली बघ हं!"

आणि त्याचे हे शब्द पुरे होतात न होतात तो त्याच्या धनुष्यातून सुटलेल्या तीराने आपले काम केले. राखणदार धाडदिशी मरून खाली पडला.

रॉबने एकवार वटारलेल्या डोळ्यांनी आपल्या शत्रूकडे पाहिले आणि रानात धूम ठोकली.

बापाच्या मरणाचा सूड त्याने उगवला होता. पण आता त्याचे स्वतःचे जीवित धोक्यात होते.

कारण दुसऱ्याच दिवशी कोतवालाने दवंडी पिटून रॉब फित्झूथ हा पुंड असल्याचे जाहीर केले आणि त्याला जिवंत किंवा मेलेला पकडून देणाराला दोनशे पौंडांचे बक्षीस देऊ केले.





# २

जंगलाच्या शिवेवर एक लहानशी झोपडी होती. तिथे एक गरीब म्हातारी विधवा राहात असे. रॉबला तिने लहानपणी अंगाखांद्यावर खेळवलेले होते.

राखणदाराचा जीव घेऊन रॉब जो पळाला तो रात्री थकूनभागून ह्याच म्हातारीकडे आसऱ्याला आला. म्हातारीने त्याला ताज्या भाकऱ्या भाजून दिल्या, प्यायला पाणी दिले, निजायला घोंगडी अंथरली, त्याचे पाय पण चेपून दिले.

घोंगडीवर पडल्यापडल्या रॉबने तिला आपली हकीकत सांगितली. म्हातारी म्हणाली, "बाळ, तू म्हणतोस ते खरं आहे. गरिबांचा छळच चालला आहे आजकाल. पोटाला खायला मिळेना म्हणून माझ्या मुलांनी एक हरिण मारलं. तशी लगेच कोतवालाने त्यांना पुंड म्हणून जाहीर केलंय. बिचारे रानात लपून-छपून असतात. आता येतीलच ते रात्री."

आणि थोड्या वेळाने खरोखरीच म्हातारीचे तिघे मुलगे घरी आले. त्यांची आणि ह्या नव्या सोबत्याची ओळख झाली आणि मग त्यांना जेव्हा

कळले, की ह्याचेही विचार आपल्यासारखे आहेत, तेव्हा त्यांनी ठरवले, की आपण सर्वांनी एक व्हायचे.

राजेसाहेब आपल्याला पुंड म्हणतात काय? ठीक आहे. पुंड तर पुंड! आपण सगळे पुंड एक होऊ या आणि राजेसाहेबांचे नोकर जी गुंडगिरी करताहेत तिचा नायनाट करू या. शरवुडच्या जंगलात ओढ्याकाठी खडकाच्या कपारी होत्या, त्यांतल्या खोल गुहा लपायला नि सामान लपवायला मोठ्या सुरेख असत. तिथेच आपला मुक्काम ठोकायचा. पण आपला पुढारी कोण?

म्हातारीच्या मोठ्या मुलाने असे सुचवले, की पुढाऱ्याला काहीतरी पराक्रम पाहिजे. तेव्हा असे ठरवू या, की नॉटिंगहॅमच्या जत्रेला आपल्यापैकी जो हजर राहील आणि तिरंदाजीतले पहिले बक्षीस मिळवील, तो आपला पुढारी. त्याप्रमाणे ठरले.

अशा वेळी माघार घेईल तर तो रॉब कसला? नॉटिंगहॅमच्या जत्रेला हजर राहायचे असा त्याचा आधीचाच बेत होता. आता तो आणखी पक्का झाला.

जत्रेला दोनतीन दिवस राहिले तेव्हा रॉबने आपला पोशाख बदलला. त्याला पक्के माहीत होते, की आपल्याला पकडण्यासाठी सगळीकडे गुप्त हेर पसरलेले असतील. जत्रेच्या मैदानाभोवती पण शिपायांचा पहारा असेल. त्यांना चुकवून आपल्याला आत शिरायचे आहे आणि बक्षीस मिळवायचे आहे. ते आपण मिळवणारच!

जत्रेचा दिवस उगवला. सकाळपासून निरनिराळ्या कसरती, खेळ झाले. दुपारी फारच महत्त्वाचा कार्यक्रम होता. तो म्हणजे नेमबाजीची शर्यत.

शर्यतीत पहिला येईल, त्याला सोन्याचा बाण बक्षीस मिळणार होता. तो मान आणि ते बक्षीस मिळावे म्हणून मोठमोठ्या सराईत तिरंदाजांत चुरस लागली होती.

त्यात मळके, फाटके कपडे घातलेला एक भिकारी पण होता. त्याचे हात नि तोंड धुळीने माखलेले होते. त्याच्या राठ केसांच्या जटा झालेल्या होत्या. आपल्याकडे कुणबी लोक मुलांना कुंची घालतात तशी एक मोठी थोरली घोंगडीची कुंची त्याने डोकीला घातली होती आणि तिचा पायघोळ झगा अंगाभोवती लपेटून घेतला होता. त्याचा तो अवतार पाहून सर्वांना हसू आले. पण शर्यतीत भाग घ्यायला कोणालाही मोकळीक होती. त्यामुळे कोणाला काही बोलता येईना.

हा भिकारी म्हणजेच आपला रॉब हे सांगायला का पाहिजे?

रॉबच्या शेजारी एक मजबूत हाडापेराचा काळा माणूस उभा होता. त्याने एक हिरवा रुमाल डोक्याला बांधला होता आणि त्या रुमालामुळे त्याचा उजवा डोळा पार झाकला गेला होता. त्याची देखील लोकांनी चेष्टा केली. पण त्याला त्यांची पर्वा नव्हती.

शर्यत पाहायला पुष्कळ लोक जमले होते. आसपास राहाणारे गरीब, श्रीमंत सर्व आले होते.

कोतवालाला बसण्यासाठी बांबूंचे एक उंच आसन तयार केले होते. कोतवालाची मुलगी आपले दागदागिने घालून मोठ्या डौलात आपल्या बापाजवळ बसली होती. राजेसाहेबांचा उपाध्या हरफर्डचा बिशप पण खेळ पाहायला आला होता. त्याच्या लठ्ठ शरीरामुळे त्याला कोणी लठ्ठ्या म्हणत, कोणी लठ्ठंभारती म्हणत. आपण आपले त्याला लठ्ठेश्वरभटजी नाव देऊ या.

आणि रॉबचा शत्रू, हंटिंग्डनचा सरदार फिझवॉल्टर देखील एका भव्य खुर्चीवर बसलेला होता आणि सर्वांत विशेष म्हणजे फिझवॉल्टरची मुलगी मेरियन सुद्धा बापाबरोबर मुद्दाम आज जत्रेच्या ठिकाणी आली होती.

अर्थात ती येणार हे रॉबला माहीत होतेच. त्याचे डोळे केव्हापासून तिलाच शोधीत होते आणि ती दिसली तेव्हा त्याला इतका हर्ष

झाला, की तो एकदम ओरडलाच असता. पण मग त्याच्या लक्षात आले, की आपल्याला आपले सोंग टिकवायचे आहे; कोणाला ओळख द्यायची नाही.

आणि त्याचा वेष इतका बेमालूम वठलेला होता, की इतरांनी काय, पण मेरियनने सुद्धा त्याला मुळीच ओळखले नाही.

शर्यतीचे पहिले शिंग वाजले आणि शर्यतीत भाग घेणारे वीसही तिरंदाज धनुष्यबाण घेऊन तयारीत उभे राहिले. एका पंचाने त्यांना नियम समजावून सांगितले.

ते उभे होते तिथून सुमारे ऐशी फुटांवर एक गोल आकाराचा फळा उभा केलेला होता. फळ्यावर एकात एक अशी काही वर्तुळे काढलेली होती आणि अगदी आतल्या वर्तुळात काळा भोर ठिपका होता. ह्यालाच म्हणतात निशाण आणि त्याला न चुकता बाण मारता येणे हीच निशाणबाजीची कला.

पहिल्या फळ्याच्या मागे काही अंतरावर दुसरा असाच फळा ठेवलेला होता आणि त्याच्याही मागे खूप लांब अंतरावर तिसरा फळा होता. पहिल्या निशाणबाजीत ज्यांचे वर नंबर येतील त्यांनाच दुसऱ्या फळ्यावर नेम धरायचा मान! त्यांतही जे थोडे यश मिळवतील त्यांनी तिसऱ्या फळ्यापर्यंत जायचे. ह्या तिसऱ्या परीक्षेतही जो पहिला येईल, तो अर्थात सगळ्या तिरंदाजांचा राजा!

दुसरे शिंग वाजले. निशाणबाजांची रांग उभी होती, तीत रॉबचा नंबर सहावा होता, पहिल्या पाचांपैकी एकाचाही बाण आतल्या वर्तुळापर्यंत पोचला नाही. रॉबने मात्र अचूक नेम धरून आतले वर्तुळ फोडले.

प्रेक्षकात 'ओहो!' 'वाहवा!' असे उद्गार निघाले. रॉबच्या मागेच कोणीतरी 'शाबास!' म्हटले. रॉबने पाहिले तर सातव्या नंबरावर तो, एक डोळा झाकलेला धटिंगण उभा होता. त्याची पाळी आली. त्याने

इतक्या सहज बाण मारला, की जणू काही आपल्याला कसली काळजीच नाही. पण त्याचा बाण नुसता आतले वर्तुळ छेदूनच गेला नाही, तर बरोबर मध्यभागी ठिपक्यात घुसला. टाळ्यांचा कडकडाट झाला आणि खुद्द रॉबनेही त्या एकडोळ्याची पाठ थोपटली.

आता दुसऱ्या फळ्यावर निशाणबाजी सुरू झाली. विसांपैकी आठ पहिल्या परीक्षेत गळलेच होते. ह्या परीक्षेतही रॉब आणि एकडोळ्या ह्यांचे तीर आतल्या वर्तुळात घुसले. शिवाय आणखी तिघा तिरंदाजांनी पण असाच पराक्रम दाखवला. 'भिकारी, भिकारी!' म्हणून रॉबला हिडिसफिडिस करणारे लोक त्याचे कौतुक करू लागले.

"आता आपण पाचच जण!" विसाव्याच्या वेळी एकडोळ्या रॉबला सहज म्हणाला. पण रॉबचे त्याच्याकडे लक्ष नव्हते. त्याची नजर मेरियनकडे लागलेली होती. तितक्यात मेरियनचीही नजर त्याच्याकडे वळली आणि मग तिला एकदम काय वाटले कोणास ठाऊक, तिने झटदिशी दुसरीकडे पाहिले.

एकडोळ्या रॉबला म्हणाला, "छान आहे छोकरी!"

रॉबने त्याच्याकडे बघितले. पण त्याच्या तोंडावर मायाळूपणा-शिवाय दुसरा भाव त्याला दिसला नाही. तेव्हा रॉबने एवढेच म्हटले, "तुला बरंच कळतं म्हणायचं. तुला खरं सांगू, एकडोळ्या? मला तू एकदम पसंत आहेस!"

तिसरी कसोटी सुरू झाली. तिच्यात बाकीचे तिघे तिरंदाज केव्हाच बारगळले. ह्या वेळी निशाण इतक्या दूर अंतरावर ठेवलेले होते, की फळा म्हणजे एखादा छोटासा ठिपकाच वाटावा. मग फळ्यावरची वर्तुळे नि त्यातला मध्यभागीचा ठिपका दिसणे शक्य तरी होते का? शिवाय आकाशात आता ढग आले होते आणि वाऱ्याच्या झुळकाही वाहात होत्या. पण इतके असून रॉबची पाळी आली तेव्हा त्याने सरकन तीर सोडला तो बरोबर मधले वर्तुळ छेदून आत गेला.

तो चमत्कार पाहून प्रेक्षकातले कित्येक लोक आपापल्या जागी उठून उभे राहिले आणि 'भिकाऱ्या'च्या नावाने जयजयकार करू लागले. रॉबने धनुष्य जमिनीला टेकले. त्याची नजर भिरीभिरी फिरली आणि मग मेरियनवर ठरली.

मेरियन त्याच्याचकडे पाहात होती.

"काय एकडोळ्या, ह्याच्यावर तुझं काय बोलणं आहे?" एका प्रेक्षकाने डिवचले.

एकडोळ्या काहीच बोलला नाही. त्याची पाळी येताच तो पुढे झाला. नेहमीप्रमाणे निष्काळजीपणाने त्याने तीर सोडला.

पण नेहमीप्रमाणे त्याने निशाणाचा मध्य गाठला नाही. आतल्या वर्तुळात देखील तो शिरला नाही. वर्तुळाच्या कडेवर टोचलेला राहिला. आणि त्या धक्क्याने, रॉबचा विजयी बाण जागच्या जागी जरा हालला आणि त्याने आपल्या शेपटीने एकाडोळ्याच्या अपेशी बाणाला एक नाजूक थप्पड दिली.

जणू काही तो त्याला हिणवून म्हणत होता, "आता कुठे गेली तुझी हुषारी?"

पण रॉबने त्याला हिणवले नाही आणि एकडोळ्यालाही मुळीच वाईट वाटले नाही. त्याने खुल्या दिलाने रॉबला शाबासकी दिली. तो म्हणाला, "वारा बदलला आहे हे मी लक्षातच घेतलं नाही म्हणून असं झालं!"

मग कोतवालाने मोठ्या समारंभाने सोन्याचा बाण रॉबला बक्षीस दिला. पण मनातून त्याला रॉबचा अगदी तिटकारा वाटत होता. अशा भिकारड्याने शर्यती जिंकाव्यात म्हणजे काय?

"तुझा एकंदर अवतार विचित्रच आहे जरा!" तो बक्षीस देताना नाक मुरडून म्हणाला, "नाव काय तुझं?"

रॉबने न डगमगता सांगितले, "रॉब."

मेरियनने ते ऐकले आणि ती स्वतःशीच हसली.

"ठीक. माझ्याकडे नोकरीला राहातोस का तू? पगार देईन चांगला. म्हणजे तुला कपडे बिपडेही करता येतील जरा नवे नवे," कोतवालाने विचारले.

मेरियन हसून म्हणाली, "मला नाही वाटत ह्या शूर माणसाला कुणाचा नोकर होणं आवडेलसं."

मेरियनने आता रॉबला ओळखले होते हे उघड आहे.

रॉबने मुकाट्याने बक्षिसाचा बाण घेतला आणि मेरियनच्या आसनापुढे जाऊन तो तिच्या हातात ठेवला.

"बाईसाहेब, गरिबाची भेट घ्या," त्याने वाकून म्हटले.

मेरियनने तो चमचम करणारा सोन्याचा बाण आपल्या वेणीत खोवला आणि ती मिस्किलपणे हसून म्हणाली, "कुंची पांघरलेल्या रॉब, तुझे आभार कसे मानू मी?"

हा सगळा प्रकार पाहून कोतवालसाहेब गरम झाले. त्यांची दागिन्यांनी मढलेली मुलगीही गरम झाली. हा काय उद्धटपणा? बक्षीस आपण दिले आणि आपल्याला कोणीच विचारीत नाही? ते काही नाही. ह्या रॉबला शिक्षा केली पाहिजे. त्याच्यावर पाळत तरी ठेवलीच

पाहिजे. पण कोतवालसाहेबांनी आपले शिपाई पाठवले, तरी त्याचा उपयोग झाला नाही. सर्वांच्या हातांवर तुरी देऊन रॉब केव्हाच पसार झाला होता.

त्या रात्री एका मोठ्या राईत चाळीस जवान इसमांची सभा भरली होती. नॉटिंगहॅमच्या जत्रेत घडलेला प्रकार रॉबने सर्वांना सांगितला. तेव्हा सर्वांनी टाळ्या पिटून त्याचा जयजयकार केला.

"पण तू बाण जिंकला म्हणतोस," एका शंकेखोराने प्रश्न केला, "तर आहे कुठे तो?"

"एका देवतेला दिला मी तो!" रॉबने गंभीरपणे सांगितले.

हे ऐकून काही लोक त्याची टवाळी करणार होते; पण रॉबबरोबर आलेला त्याचा नवा एकडोळ्या दोस्त आता पुढे झाला. त्याने डोक्याभोवती गुंडाळलेले हिरवे फडके ओढून काढले. तेव्हा सगळ्यांना दिसून आले, की स्वारीचा उजवा डोळाही चांगला शाबूत आहे!

"रॉब सांगतो ते बरोबर आहे." त्याने ठासून म्हटले, "ती छोकरी म्हणजे देवताच होती. पण बाणाशी काय करायचंय तुम्हांला? रॉबने शर्यत जिंकली हे तर खरंच! नॉटिंगहॅमधला फाटका इसम सुद्धा सांगेल तुम्हांला. आता तुम्ही ठरवलंय त्याप्रमाणे त्याला आपला पुढारी करा! मी पण ह्यापुढे तुमच्यातच काम करणार! रॉब, तुला काय रे नाव दिलं त्या देवतेने?"

"कुंची पांघरलेला रॉब...."

"कुंचीतला रॉब! ....बरोबर 'रॉब इन हुड!' मग ह्यापुढे आपल्या नायकाला रॉबिन हुडच म्हणायचं, बरं का दोस्त हो?"

ही सूचना सर्वांना एकजात पटली.

"जय रॉबिन हुड!" ह्या आरोळीने शरवुडचे रान दणाणून गेले!



# ३

रॉबिन हुडच्या रंगेल टोळीने चांगलेच नाव कमावले. शरवुडच्या जंगलात खरी सत्ता आता रॉबिनचीच होती. रॉबिन हुडचे शिंग वाजले, की जो तो कान टवकारी आणि हातांतले काम टाकून लपण्यासाठी आसरा शोधी. रॉबिनचा रामबाण कुठून येईल नि कोणाचा बळी घेईल ह्याचा नेम नसे. झाडाची पाने वाऱ्याने हालली तरी एखाद्याला वाटावे रॉबिन तर नाही आला?

पहिल्यापहिल्याने रॉबिन हुडला गरीब, श्रीमंत सगळेच लोक भीत; पण लवकरच लोकांना कळून चुकले, की गरीब लोकांना रॉबिनपासून भीती नाही. रॉबिन हुडचा असा नियम होता, की गरिबांना मुळीच त्रास द्यायचा नाही. त्याच्या टोळीतल्या लोकांनी देवापुढे शपथ घेतली होती, की दीनदुबळ्यांना छळायचे नाही आणि बायकांच्या केसालाही धक्का लावायचा नाही. उलट त्यांना शक्य तितकी मदत करायची. पण गरिबांवर जे श्रीमंत जुलूम करीत त्यांना मात्र खुशाल लुबाडायचे. त्यांना शिक्षा करायची, त्यांचा पैसा लुटायचा आणि तो गरीब प्रजेला वाटून द्यायचा.

हे कळल्यावर शरवुडच्या गरीबगुरीब जनतेला आनंद झाला. ते सरकारी जुलुमाला इतके कंटाळले होते, की रॉबिन त्यांना देवच वाटला. रॉबिनला नि त्याच्या लोकांना ते मोठ्या खुषीने मदत करू लागले; त्यांना आसरा देऊ लागले. जास्तजास्त लोक त्याच्या टोळीला येऊन मिळाले. लवकरच टोळीची संख्या ऐंशीपर्यंत पोचली.

रॉबिनचे पराक्रम वाढत गेले तसा कोतवाल त्याच्या नावाने बोटे मोडू लागला. रॉबिनला पकडण्यासाठी त्याने जंगजंग पछाडले, पण काही उपयोग झाला नाही. दर वेळी असे होई, की कोतवालाने काही तरी नवी युक्ती योजावी आणि ती फसून त्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यात याव्यात.

एक दिवस काही काम नव्हते म्हणून रॉबिन अगदी कंटाळला होता. कंटाळा आला, की काय करायचे हे त्याचे ठरलेलेच होते. त्याने तिरकमठा उचलला आणि स्वारी भटकायला निघाली. आपल्या दोस्तांना त्याने सांगितले, "हवा तर मोठी झक्क पडली आहे. अशा वेळी तुम्हांला घरकोंबड्यासारखं बसवतं कसं? आपण तर आज नॉटिंगहॅमला जाणार. बऱ्याच दिवसांत शहरची मजा बघितली नाही." असे म्हणून तो मजेने गात गात निघाला सुद्धा.

पण सरळ रस्त्याने जाईल तर तो रॉबिन कसला? त्याने मुद्दामच किर्र जंगलातून एक जवळची आडवाट काढली. शरवुडच्या अरण्यातल्या बारीकसारीक वाटा सुद्धा रॉबिनला तोंडपाठ होत्या. त्यामुळे त्याला अडचण मुळीच भासली नाही.

पण नाही कशी? लवकरच त्याला एक ओढा लागला. नुकताच पाऊस पडून गेला होता. त्यामुळे ओढ्याला पूर येऊन पाणी धो धो वाहात होते. पण कोणी तरी एक मोठे झाड तोडून त्याचा झक्क पूल बनवला होता. त्यावर पाय देऊन रॉबिन आता पलीकडे जाणार तोच....

पलीकडून त्याच वेळी कोणी तरी पुलावर पाय ठेवला आहे असे त्याला दिसले. रॉबिनने अजून राक्षस पाहिला नव्हता. पण समोरून येणारा तो भला दांडगा माणूस पाहिल्यावर त्याला वाटले, राक्षस राक्षस म्हणताच तो हाच असावा! काय त्याचे उंच धिप्पाड शरीर, काय ते राकट कल्ले नि मिशा आणि काय तो हातातला दणकट सोटा!

पण त्याला पाहून सुद्धा रॉबिनने आपला वेग कमी केला नाही. मोठ्या ऐटीने झपाझप चालत तो पुलाच्या मध्यापाशी पोचला. त्याच वेळी तो राक्षस लांब लांब टांगा टाकून तिथे येऊन ठेपला होता. दोघेही थांबले आणि त्यांनी डोळे वटारून एकमेकांकडे पाहिले.

रॉबिन हुड एका टोळीचा पुढारी होता. त्याला अशी सवय झालेली होती, की आपण हुकूम सोडावेत नि लोकांनी ते ऐकावेत. आपल्यापेक्षा वरचढ कोणी निघेल असे त्याला स्वप्नात सुद्धा खरे वाटत नसे. रॉबिन होता मोठा दिलदार गडी; पण खरे सांगू? आताशा त्याला जरा 'ग'ची बाधा झाली होती!

आताही तसेच झाले. आपल्या वाटेत आडवा येणारा हा दांडगोबा कोण असे रॉबिनला वाटले.

तो गुरगुरला, "कोण रे तू? हट जाव वाटेतून दूर!"

पण दांडगोबा गुरकावणीला मुळीच भ्याला नाही. तो नुसता हसला आणि म्हणाला, "आस्ते....आस्ते जरा! हे बघ, माझ्यापेक्षा भारी गड्यालाच मी वाट देत असतो!"

"मुकाट्याने दूर हो. नाही तर भारी गडी म्हणजे काय असतो ते पाहायला मिळेल तुला!"

"तसं होईल तर फारच छान!" राक्षस खुषीत येऊन म्हणाला.

रॉबिनला चेव यायला एवढे बस्स होते. त्याने भात्यातून तीर काढला आणि धनुष्य सज्ज केले. पण तो राक्षस पुन्हा एकदा हसला.

"वा! चांगलाच भारी गडी आहेस की तू!" तो उद्गारला, "माझ्याजवळ नुसता सोटा आणि तू मात्र धनुष्यबाण घेऊन माझ्याशी लढायचं काय? ह्याला भारी म्हणत नाहीत....भेकड म्हणतात!"

रॉबिनला 'भेकड' शब्द फार लागला. एखादा बाण छातीत घुसला असता तरी त्याला इतके वाईट वाटले नसते. त्याने लगेच तिरकमठा फेकून दिला आणि म्हटले, "ठीक आहे, पण मी तलवारीने झाडाची एक फांदी तोडून घेतो तोवर थांब जरा!"

लवकरच रॉबिनची लाठी पण तयार झाली आणि ती घेऊन पुढे सरसावत तो म्हणाला, "हं! चल, आता तुझ्या बरगड्यांचं मी तुणतुणं वाजवणार आहे. ऐकायला तयार हो. एक....दोन...."

"तीन!" असे म्हणून राक्षसाने लाठीचा पहिलाच वार असा केला, की रॉबिनने जरा मान चुकवली नसती तर त्याच्या डोक्याची खापरे झाली असती.

तेवढ्याने रॉबिन सावध झाला आणि त्यानेही मोठ्या हुषारीने लाठीचे हात फिरवायला सुरुवात केली.

सप....सप....

सपासप!

लढाई मोठी चुरशीची झाली. राक्षस जितका सशक्त होता तितकाच रॉबिन चपळ होता. त्यामुळे राक्षसाचे तडाखे जबरदस्त असले तरी रॉबिन ते सफाईने चुकवीत होता. त्या एवढ्याशा अरुंद पुलावर पाय सावरून लढायचे म्हणजे सोपे नव्हते आणि तरी अर्धा तासपर्यंत ही झुंज चालली होती. एकदा तर रॉबिनच्या एका वाराने राक्षसाची ओढ्यातच ढकलंती होणार होती. इतकेच नाही, तर रॉबिनची जवळ जवळ खात्रीच झाली, की आपण शत्रूला ह्या वेळी लोळवला! पण शत्रू लोळला तर नव्हताच, उलट स्वतःला झटकन सावरून त्याने रॉबिनवरच उलट हल्ला केला होता. रॉबिन मनात मांडे खात होता तेवढ्यात त्याने आपल्या

लाठीने असा एक जोराचा रट्टा दिला, की रॉबिनच्या डोळ्यांपुढे तारे चमकले आणि इतके तारे, की सबंध ज्योतिषशास्त्रात सुद्धा तितके तारे दिले नसतील!

दुसऱ्याच क्षणी रॉबिनचे शरीर कोलमडले आणि ओढ्यात पडले.

"होः होः!" राक्षस गुडघ्यांवर हात ठेवून खाली डोकावत म्हणाला, "हे फारच छान झालं! आता ही माझी लाठी पकड नि वर ये. आणि हे बघ, आता तुझं डोकं जितकं गरगरत आहे ना, तितकं तुझ्या जिभेला फुरफुरायला सांगू नकोस ह्यापुढे!"



पण रॉबिनचे डोके ठिकाणावर होते कुठे? तो बेशुद्धच पडला होता. गार पाण्यात चार पाच गटांगळ्या खाल्ल्यावर मात्र तो आपोआप शुद्धीवर आला आणि मग आपल्या सामनेवाल्याची लाठी पकडून त्याने कसेबसे पाण्याबाहेर अंग काढले.

"पुरती अद्दल घडली बुवा मला!" तो म्हणाला, "माझं डोकं असं भणभणत आहे, की जसं काही मधमाश्यांचं मोहोळच.... आता असं करतो...."

असे म्हणत त्याने आपले शिंग काढले आणि जोराने फुंकले.

हा हा म्हटता आसपासच्या झाडीतून कितीतरी लोक मुंग्यांसारखे बाहेर पडले आणि त्यांनी रॉबिनभोवती घोळका केला.

म्हातारीच्या मोठ्या मुलाने आश्चर्याने म्हटले, "हे रे काय रॉबिन?.... तुझ्या अंगावरचा धागा न धागा ओला कसा झाला?"

"असं झालं खरं!....हा दांडगोबा पाहिलात? मला तो पुलावरून जाऊ देईना म्हणून मी काठीने त्याच्या बरगडीत जरा कुठे टोचलं तर त्याने माझं टाळकं फोडून मला नदीत डुंबवला!"

"अस्सं?.... मग आपण सगळे धडाच शिकवू या त्याला.... चला रे...."

"छे छे छे छे!" रॉबिन आपल्या लोकांना थांबवून हसत म्हणाला, "त्याच्यासारख्या सोटाबहाद्दराला त्रास देऊ नका. आमची चकमक अगदी तोलाची झाली."

त्या गृहस्थाने रॉबिनच्या टोळीतल्या सर्व लोकांवरून एकदा आश्चर्याची नजर फिरवली आणि विचारले, "तुझं नाव काय?"

"मला रॉबिन हुड म्हणतात."

"खरं की काय!.... मग उगाच तुला झोडपलं!.... मी तुलाच भेटण्यासाठी निघालो होतो. म्हटलं, आपणही तुझ्या टोळीत सामील व्हावं. पण आत्ता जो आपण तमाशा केला आहे त्यामुळे ते आता शक्य दिसत नाही. आता थोडाच तू मला मित्र मानशील!"

हे ऐकून रॉबिन खो खो करून खूप मोठ्याने हसला आणि म्हणाला,

"तुझं नाव काय?"

"जॉन लिटल."

"भले तर. जॉन लिटल, आजपासून तू आमचा टोळकरी झालास. त्याच्यासाठी मोठासा समारंभ करावा लागत नाही.... वर्गणी मात्र जबर असते. ती म्हणजे दिल नि शरीर. आम्हांला मरेपर्यंत तुझं दिल नि शरीर हवं आहे."

" आणि समारंभ देखील असतोच की एक, " रॉबिनचा एक गमत्या सोबती पुढे होऊन म्हणाला, " बरं का हो लिटलसाहेब, आमच्याकडे एक अशी पद्धत आहे, की नवा संवगडी आला, की त्याचं नाव ठेवायचं असतं.... तेव्हा.... काय रॉबिन, ह्या चिमुकल्या बाळाला घालायचं न पाळण्यात ? "

" चिमुकलं बाळ आहे खरं...." रॉबिन त्याच्या आडदांड शरीराकडे कौतुकाने पाहात बोलला. " तुझं नाव जॉन लिटल ना ?.... छे छे. तुझं नाव बदललं. आता तू लिटल जॉन झालास! ....ह्याला आतापासून धाकला जॉन म्हणायचं, बरं का मंडळी ? "

मंडळींनी 'धाकला जॉन!" म्हणून एकच आरडाओरडा केला आणि तेव्हापासून धाकला जॉन हा रॉबिन हुडचा अगदी जिवाभावाचा मित्र बनला.



# ४

मारामारीच्या खालोखाल रॉबिनला जर काही आवडत असेल तर ते म्हणजे तऱ्हेतऱ्हेचे वेष करणे.

एकदा सकाळची सहल करीत असता त्याला एक खाटीक भेटला. आपल्याजवळचे भरघोस ताजे मांस एका घोड्याच्या पाठीवर लादून तो नॉटिंगहॅम शहराकडे आस्ते आस्ते चालला होता.

"क्यों, खाटीकदादा? कुठे निघालात?" रॉबिनने सहज विचारले.

"चाललो शहराला. आज बाजाराचा दिवस ना, मालाला भाव चांगला येईल.... आपलं नाव?"

"रॉबिन हुड."

खाटकाने ते नाव ऐकले मात्र, हातातला लगाम टाकून त्याने अशी एक उडी मारली की ज्याचे नाव ते.

"रॉबिन हुड! अयाया! ....पण रॉबिनदादा, मी अगदी गरीब माणूस आहे. आठवड्याला चारदोन बकरे कापून जेमतेम पोट भरतो."

"भिऊ नकोस, बच्चा, भिऊ नकोस!" रॉबिनने त्याची समजूत घातली. "तुझी एक कवडी सुद्धा मला नको आहे. तुझ्यासारखी प्रामाणिक माणसं मला आवडतात. पण तुझ्याशी मला एक सौदा मात्र करायचा आहे."

असे बोलत बोलत त्याने आपल्या कंबरपट्ट्यातून एक थैली काढली....

"मला आज लहर लागली आहे, की खाटीक व्हावं नि बाजारपेठेत मांस विकावं. तेव्हा तुझा हा सगळा लालभडक माल, तुझं ते राजबिंडं तट्टू, मला विकत दे. ....चार पौंड देतो!"

"कबूल," असे ओरडून खाटकाने लगाम सोडून ताडदिशी रस्त्यावर उडी मारली. नाही तरी ह्या वयात नॉटिंगहॅमपर्यंत हैयाक हैयाक करीत जायचे नि तिथे दिवसभर गिऱ्हाइकाची वाट पाहात बसायचे म्हणजे थोडी यातायात नव्हती. त्यापेक्षा इथल्या इथे चार पौंड मिळताहेत त्या काय वाईट, असा त्याने विचार केला.

रॉबिनने पैसे दिले आणि तो म्हणाला, "एवढ्यावर भागायचं नाही. तुझे कपडे मला दे नि माझे तू घाल."

त्यालाही खाटीक आनंदाने कबूल झाला. रॉबिनचा प्रसिद्ध हिरवा झगा नि लाल टोपी घातल्यावर त्याला थोडा वेळ वाटले आपणही जणू कोणी शूर पुरुष आहो. तो आनंदाने सलाम करून निघून गेला.

इकडे रॉबिनने एक गाणे गुणगुणत आपला घोडा नॉटिंगहॅमच्या बाजारपेठेत नेला.

तिथे तर त्याने कमालच केली. त्याच्यासारखे दुसरे खाटीक तिथे मांस विकायला आले होते. पण गिऱ्हाइकांची गर्दी उडाली रॉबिन खाटकाच्या गाळ्यावर. कारण तो एवढ्या मोठ्याने ओरडत होता नि लावण्या म्हणत होता, की ज्याला त्याला त्याच्याचकडे जावेसे वाटे आणि शिवाय त्याचे भाव फारच कमी होते. शेजारच्या खाटकाने दोन सेंटस्ना

एक औंस मांस विकले तर हा एका सेंटला दोन औंस विकी! त्यामुळे गिऱ्हाइके खूष होती; तर दुसरे खाटीक नाखूष होते.

संध्याकाळी बाजार उठला.

नॉटिंगहॅमच्या हाडकुळ्या कोतवालाची एक अशी पद्धत होती, की दर बाजाराला कोणाला तरी जेवण द्यायचे. कधी लोहारांना, कधी सुतारांना, कधी भटाऱ्यांना कोतवालसाहेब पंगतीला बोलावीत असत. ह्या खेपेस खाटकांची पाळी होती. त्यामुळे रात्र पडताच सर्व खाटीक कोतवालाच्या वाड्यात भोजनाला जमले.

इकडे कोतवालाच्या कानावर ह्या तोतया खाटकाचे चाळे अगोदरच गेले होते. कोणी म्हणत, इतके स्वस्त विकतो तेव्हा ह्याच्या घरचे मांस नसावेच हे. कुणाचे तरी चोरून आणलेले असावे. कोणी म्हणत, बापाची इस्टेट नुकतीच मिळाली आहे ह्याला आणि ती कशी सांभाळावी ते समजत नाही. कोणी मात्र चक्क असे सांगत, की ह्या राजेश्रींचा एक स्क्रू ढिला आहे, त्यामुळे नुकसानीत माल विकायला त्याला काही वाटत नाही.

कोतवालाला हे शेवटचेच खरे वाटत होते आणि त्या लोभी माणसाच्या डोक्यात एक नवीनच विचार आला होता.

टेबलाशी पंगत बसली, तेव्हा त्याने रॉबिनला मुद्दाम आपल्या डाव्या हाताला बसविले. उजव्या हाताला बसले होते राजेसाहेबांचे लठ्ठ भटजीबोवा. काडीपैलवान कोतवालाशेजारी तो लठ्ठेश्वर अगदी शोभून दिसत होता.

इतक्यात चाकर जेवणाची ताटे घेऊन आले. लगेच रॉबिन उठला आणि त्याने लठ्ठेश्वरभटजीचे आभार मानले! तो म्हणाला, "दोस्त हो! आता सावकाश जेवा नि अगदी खच्चून जेवा. माल कोतवालसाहेबांचा आहे. तेव्हा आपल्या बापाचं काय जातं उडवायला!"

हा त्याचा विनोद वाटून सगळ्यांनी टाळ्या पिटल्या.

गोरामोरा झालेला कोतवाल बळेच हसून म्हणाला, "तुम्ही थट्टेखोर दिसता. घरचंही सगळं चांगलं दिसतं. ....किती मेंढरं आहेत जवळ?"

"मेंढरं बिंढरं नाहीत बा...." रॉबिन घटाघट सांबारे पीत म्हणाला, "मी हरणं पाळत असतो."

"वा छान! किती आहेत हरणं?"

रॉबिनने लांब जीभ काढून बशी चाटली आणि म्हटले, "असतील पाचएकशे."

"पाचशे?"

"सहाशे धरा. ....पण मी बारीक सारीक मोजीत नसतो."

जरा वेळ विचार करून कोतवाल म्हणाला, "मला एक कळप विकत घ्यायचा आहे म्हणून मुद्दाम विचारलं. टाकायचा का फुंकून? बघा! ....म्हणजे नेहमी नेहमी बाजारला यायला नको."

"केवढ्याला घेता?"

कोतवाल हुरळून गेला. रॉबिन भोळसर असला तरी इतक्या लवकर सौद्याला तयार होईल असे त्याला वाटले नव्हते. स्वस्तात माल मिळवून ह्या मूर्ख इसमाला गटवायचे असे त्याने नक्की ठरवले.

"तुम्हीच सांगा केवढ्याला?"

"वीस पौंडांना. ....पण कोतवालसाहेब, उद्या आपणच या ना माझ्या मळ्यावर आणि बघा माल. तुम्हांला वाटतील ती हरणं निवडून घ्या."

"ठीक," कोतवाल आणखीच आनंदून बोलला, "मग असं करू, आज तुम्ही इथेच झोपा. सकाळी आपण बरोबरच जाऊ."

रॉबिनला वाटले, आपण घसरलो. त्याचा बेत असा होता, की कोतवालाला फूस लावून शरवुडच्या जंगलात यायला सांगावे. तिथे ठरलेल्या ठिकाणी आपले संवगडी जमलेले असतील त्यांच्याकडून त्याची चांदी उडवावी! पण आता कोतवाल म्हणतो इथेच राहा म्हणून. म्हणजे

त्याच्या बरोबरच आपल्याला जावे लागणार. बरे, त्याला नाही म्हणावे, तर आपले सोंग बाहेर पडायची भीती!

"बरं." त्याने अधिक वेळ न घालवता उत्तर तर दिले.

त्याने ते उत्तर द्यायला आणि दरवाजा उघडून एक चाकर दारूचे प्याले घेऊन आत यायला एकच गाठ पडली. त्या चाकराला पाहून रॉबिनला भयंकर आश्चर्य वाटले. कारण तो त्याचा जानी दोस्त धाकला जॉन होता.

धाकला जॉन इथे कसा? ही काय भानगड आहे? एकीकडे आपला मित्र म्हणवून दुसरीकडे आपल्याशी दगलबाज़ी करायचा तर जॉनचा बेत नाही? पण हा विचार रॉबिनच्या मनात क्षणभर सुद्धा टिकला नाही. धाकल्या जॉनच्या इमानाबद्दल त्याची खात्री होती. असला वाईट विचार मनात यावा ह्याचेच रॉबिनला आता वाईट वाटले.

आणि तरी 'धाकला जॉन इथे कसा' हा प्रश्न अजून सुटला नव्हताच. पण रॉबिन विचारात गढला आहे इतक्यात चाकराचे सोंग घेतलेला त्याचा दोस्त त्याच्याजवळ आला आणि दारूचा प्याला त्याच्या हातात देता देता हळूच म्हणाला,

"रात्री सैंपाकघरात भेट मला."

आणि त्याप्रमाणे रात्री रॉबिन हुडने त्याला सैंपाकघरात गाठले.

कोतवालसाहेबांनी आपल्या पाहुण्याला झोपायला खास खोली दिली होती. पण पाहुण्याला झोप कुठली यायला?

सगळीकडे निजानीज झाल्याबरोबर तो उठला आणि लपत छपत वाड्याच्या सैंपाकघराकडे गेला. पण तो एकदम सैंपाकघरात शिरला नाही.

तिथे नुकतीच काहीतरी बाचाबाची झालेली होती आणि आता दोन इसम मध्येच जखमांचे रक्त पुशीत नि मध्येच आपले फाटलेले कपडे सावरीत समोरासमोर उभे होते. त्यातला एक होता धाकला जॉन नि

दुसरा कोतवालसाहेबांचा आचारी. दोघ्यांच्याही पायापाशी नागव्या तलवारी पडलेल्या होत्या.

"बकरा चिरतात तसा तुला कापायचा विचार होता माझा," आचारी बोलत होता,

"पण जाऊ दे. आपण दोघेही सारखेच आहो."

"ते मला पटलं," धाकल्या जॉनने उत्तर दिले, "नाही तर तुझे दोन्ही कान आणि भरीला ते लांब नाक छाटून टाकायचा माझा बेत होता. पण आचारीबुवा, तुमच्यासारख्या कसबी माणसाने कोतवालाची नोकरी करावी हे बरं नाही.... माझ्याबरोबर येता का?.... नोकरीला?...."

"कुणाकडे?"

"माझ्याकडे!" रॉबिन एकदम सैंपाकघरात पाऊल टाकीत म्हणाला, "रॉबिन हुडकडे."

"रॉबिन हुड!"

खुद्द कोतवालाच्या घरात रॉबिन हुड पाहुणा म्हणून वावरतो आहे हे कळल्यानंतर आचारीबुवांना हुडहुडीच भरली! पण ती थोडाच वेळ. आचारी तसा धाडसी होता; आणि रॉबिन हुडचे पराक्रम ऐकून त्याला त्याच्याबद्दल कधीपासूनच आदर वाटायला लागलेला होता. त्याने मोठ्या आनंदाने रॉबिनचा हात दाबला....

"ह्यापुढे मला तुझा नोकर समज. माझं नाव मच. चक्कीवाल्याचा मुलगा मच."

"शाबास मच. आता तू धाकल्या जॉन बरोबरच शरवुडला जा."

"आणि तू रे रॉबिन?" धाकल्या जॉनने विचारले.

"माझा मान मोठा. मला खुद्द कोतवालसाहेब आपल्याबरोबर नेणार आहेत," रॉबिन हसून म्हणाला, "पण धाकल्या जॉन, ही भानगड काय आहे, सांग आधी. तुला ही दुर्बुद्धी का झाली?"

"बाबा रे," धाकला जॉन मोठा पोक्तपणाचा आव आणून सांगू लागला, "अशी दुर्बुद्धी झाल्याशिवाय मोठमोठी कामं होत नसतात. तुला तो प्रसिद्ध लाठीबहाद्दर एरिक माहीत आहे ना?"

"बरं मग?"

"परवा इथे लाठीचे खेळ झाले. त्यांत त्याला बराच जय मिळाला म्हणून स्वारी गर्वाने फुगून गेली होती. मला ते पाहावेना. मी भिकाऱ्याचा वेष घेऊन खेळ पाहात उभा होतो. मनगटाची खुमखुमही चैन पडू देईना. शेवटी घेतली सामन्यात उडी नि जिरवला त्या एरिकला."

"पुढे?"

"पुढे काय? कोतवालसाहेब खूष झाले नि म्हणाले, माझ्याकडे नोकरीला राहातोस? ....आपल्याला काय? राहिलो इथे. खायला प्यायलाही भरपूर आहे आणि ....शत्रूच्या गोटात राहिलेलं वाईट नाही आपल्यापैकी एखाद्याने. ....इथे आल्यावर हे आचारीबुवाही जुने ओळखीचे निघाले ....मघांची आमची मारामारी आपली प्रेमाची होती बरं का?"

"समजलं. तुझ्या प्रेमाची कल्पना आहे मला," रॉबिन हसून म्हणाला, "पण ते जाऊ दे. आता उद्याचा काय बेत ....तुम्हांला दोघांना उद्या अगोदर गेलं पाहिजे आणि आपले चाळीस लोक तरी तयार ठेवले पाहिजेत. जागा सांगतो ....जरा कान कर इकडे."

धाकल्या जॉनने कान बराच तिकडे केला. रॉबिनने कुठे जमायचे ते ठिकाण सांगितले.

आणि मग धाकला जॉन नि चक्कीवाल्याचा मुलगा मच हे दौडतच तिथून निघाले. निघण्यापूर्वी सैंपाकघरातली मिळतील तेवढी चांदीची भांडी मात्र लांबवायला त्यांनी कमी केले नाही.

दुसऱ्या दिवशी कोतवालाच्या तबेल्यात एका काळ्या घोड्यावर स्वार होऊन रॉबिन आपल्या यजमानाबरोबर निघाला. शरवूडच्या जंगलातून

वेडीवाकडी वळणे घेत जाताना तो मुद्दाम खवचटपणाने कोतवालाला म्हणतो, "हे शरवुडचं रान आहे, माहीत आहे ना?"

"बरं मग?" कोतवालाने विचारले.

"तो खट रॉबिन हुड म्हणे इथेच राहातो. जरा सावधगिरीने गेलेलं बरं."

"अरे जा! पुष्कळ पाहिलेत असले रॉबिन हुड!"

रॉबिन खो खो करून हसला आणि त्यांचा प्रवास दुप्पट जोराने पुढे सुरू झाला.

पण बराच वेळ झाला तरी रॉबिनचा मळा येईना असे पाहून कोतवालाची चुळबुळ सुरू झाली.

बिचारा ह्या घोडदौडीने अगदी दमून गेला होता. त्याने कंटाळून विचारले, "अजून येत नाही तुमचा मळा?"

"आलाच.... आलाच...." रॉबिन त्याच्या पाठीवर थाप मारून प्रेमाने म्हणाला, "तो पाहिलात आमचा मळा आणि तो पाहिलात आमचा कळप?"

"म्हणजे?"

कोतवालाला तो काय म्हणतो आहे तेच समजेना. त्याने चमकून त्याच्याकडे पाहिले आणि मग तो बोटाने दाखवीत होता तिकडे पाहिले.

दाट जंगलाच्या मध्यभागी एक मोठे मोकळे कुरण होते आणि तिथे हरणांचा एक मोठा कळप चरत होता. वीज चमकावी तसे कोतवालाला झाले. त्याच्या डोक्यात एकदम प्रकाश पडला. कारण रॉबिन हुड दाखवीत होता तो कळप राजेसाहेबांच्या खास राखीव हरणांचा होता.

"तू कोण आहेस?" कोतवालसाहेब चाचरत चाचरत बोलले.

रॉबिनने रान दणाणून सोडणारे हास्य केले. जणू काही 'काय वेडगळ प्रश्न करता?' असेच त्याला म्हणायचे होते,

आणि मग त्याने आपले आवडते शिंग काढून फुंकले. लगेच बिळाबिळांतून ससे निघावेत तसे सभोवतालच्या रानातून तिरंदाज निघाले आणि त्यांनी कोतवालाला गराडा दिला.

कोतवालाची बोबडीच वळली.

"म-म-मला वाटलंच. तू र-र-रॉबिन हु-हु-हु-हु...."

"होः होः होः होः!" रॉबिन हुड अगदी मनापासून हसला.

"भारीच चलाख बुवा तुम्ही कोतवालसाहेब! ....पण चला, आज आता तुम्हांला आम्ही तसे नाही सोडणार! आमच्याकडे पुख्खा झोडला पाहिजे."

आणि खरोखरीच कोतवालाला रॉबिनकडे पुख्खा झोडावा लागला. आणि त्याने तो पहिल्याने आंबट तोंडाने आणि मग अगदी जिभल्या चाटीत झोडला. कारण सगळे पदार्थ अगदी झकास झाले होते. इतकी सुंदर पक्वान्ने बनवणारा आचारी आहे तरी कोण म्हणून कोतवालाने जेव्हा चौकशी केली, तेव्हा रॉबिनने सरळ मचच्या गळ्यात हात घालून त्याला पुढे आणून उभा केला आणि मचने एक डोळा मिचकावीत आपल्या जुन्या मालकाला सलाम केला. त्याच्याच बरोबर मागे उभा असलेल्या धाकल्या जॉननेही सलामी ठोकली.

बिचारा कोतवाल आश्चर्यात बुडूनच गेला. तेव्हा त्याने आणखी थोड्या गटांगळ्या खाव्यात म्हणून नुकतीच चाटून पुसून लख्ख केलेली ताटे नि चमचे उजलून मचने त्याच्या डोळ्यांसमोर नाचवली. कोतवालाच्या जेव्हा लक्षात आले, की ही सगळी चांदीची भांडी पण आपल्याच वाड्यातली आहेत....

तेव्हा आता हा छळ पुरे झाला असे वाटून कोतवालाने अगदी कोपरापासून हात जोडले आणि म्हटले,

"रॉबिन हुड, सोड मला आता. तू शूर आहेस. असं मला फसवून मारायचा तर बेत नाही ना तुझा?...."

रॉबिनने आपली हनुवटी कुरवाळीत ऐटीत विचारले, "ह्यापुढे आम्हांला त्रास देणार नाहीस?"

"देवाशप्पथ सांगतो, ह्यापुढे तू नि तुझी टोळी ह्यांना शरवुडच्या अरण्यात माझ्यापासून भीती नाही."

लगेच रॉबिनने एका माणसाकडून त्याचे खिसे तपासले. होत्या नव्हत्या तेवढ्या मोहरा काढून घेतल्या आणि मग दोनतीन मैलांपर्यंत त्याच्याबरोबर स्वतः जाऊन त्याने त्याला रानातून वाट काढून दिली.

अर्थात तसे करताना त्याने इतकी वेडीवाकडी वळणे घेतली, की केवढेही डोळे ताणून कोतवालाने आसपास पाहिलेले असले तरी त्याला पुन्हा वाट सापडणे शक्य नव्हते!



# ५

सूर्य भालावर उंच चढलेला असेल. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळे पाण्याजवळ बसायला गंमत वाटत होती. त्यातून शरवुडच्या किर्र जंगलातून मंद झुळझुळ वाहाणाऱ्या त्या ओढ्याजवळ आले, की हलूच नये असे वाटावे. रॉबिन हुड आणि धाकला जॉन गप्पा मारीत रेंगाळत तिथे आले तेव्हा त्यांनाही असेच वाटले. ओढ्याचे पाणी किंचित खळखळ करीत दगडगोट्यांवरून चालले होते. झाडांच्या पानांतून डोकावणारी किरणे पाण्यावर नाचत होती. फुलांचा गोड सुवास सुटला होता. पक्षी मधुर गाणी गात होते. बाकी वेळ मोठी शांत होती.

रॉबिन आणि धाकला जॉन ओढ्याच्या काठावर येऊन वाळूत उताणे पडले. समोरच एका उंच झाडाला मधाचे पोळे लोंबत होते आणि मधमाश्यांचा थवा गूं गूं करीत पोळ्याभोवती हिंडत होता.

हे दोघे सोबती ती गंमत पाहात पडले आहेत तोच एक नवीनच गाण्याचा आवाज त्यांना दुरून ऐकू आला. हे गाणे पक्ष्याने म्हटलेले नव्हते, माणसाने म्हटलेले होते.

गवताचा एक पुंजका उपटून तो चावीत धाकला जॉन म्हणाला, "हृदय हलकं करतोय बापडा...."

"आपल्याला त्याच्या हृदयाशी काय करायचंय," रॉबिन म्हणाला, "त्याची थैली हलकी करणं हे आपलं काम आहे!"

चुपचाप बसून दोघे कान देऊ लागले. थोड्याच वेळात बाजूच्या झाडीतून एक तांबडा तरुण बाहेर पडला. तांबडा म्हणायचे कारण असे, की पायांपासून डोक्यापर्यंत त्याने तांबडा पोशाख केलेला होता. पायातले रेशमी मोजे नि अंगातला मखमली डगला तर रक्तासारखा लाल होताच, पण डोक्यावर तिरकी ठेवलेली टोपी सुद्धा तांबड्या लाल सूर्यबिंबासारखी दिसत होती. त्या टोपीत एक लांबलचक डौलदार पीस होते. टोपीतून लोंबणारी त्याच्या लांबलांब केसांची झुलपे मात्र पिवळी सोनेरी होती. त्याचा चेहेराही अगदी नाजूक मुलीसारखा होता. पण कंबरेला तलवार लटकत होती, तिच्या म्यानेवर मात्र शूर लढवय्याची नि धाय धाय रडणाऱ्या मुलींची चित्रे होती.

त्याला पाहून रॉबिनने नाक मुरडले आणि म्हणाला, "आहे झालं नाजूक नार!" पण धाकल्या जॉनचे मत पडले, की "चेहेरा बायकी असला तरी आंगलट मजबूत आहे; तेव्हा एकंदरीत शूरच असावी ही स्वारी!"

त्यांच्या ह्या वादाचा लवकरच निकाल लागला. कारण रॉबिनने नेहमीप्रमाणे त्याला हटकले आणि 'थैली दाखव' म्हटले.

तेव्हा फारच नवल वाटून तो भुवया उंच करीत म्हणाला, "थैली? ....छे बुवा! मी वाटेल त्याला थैली दाखवीत नसतो."

"असं?" रॉबिन चिडून म्हणाला. त्याला चीड येणे साहजिक होते. कारण धाकला जॉन हे सगळे पाहून गालातल्या गालात हसत असेल अशी त्याला खात्री होती. "तर मग हो लढायला तयार! तुझ्या त्या गोंडस केसांना रक्ताने न्हाऊ घालतो, चल."

"च च च!" तो तरुण एकीकडे उसासा टाकीत नि एकीकडे तलवार उपशीत म्हणाला, "वाटलं होतं आज जरा शांतपणे वाट चालावी म्हणून, तर ही नसती ब्याद उपटली. आता आलं ह्याच्या छातीत तलवार खुपसणं?.... बरं बुवा, तसं का होईना!"

तरुण मुळीच डरत नाही हे पाहून रॉबिनला आश्चर्य वाटले, पण तो हट्टाने म्हणाला, "कशाला घेतोस ती नाजूक तलवार? माझ्या दंडुक्याने खांडोळी होतील तिची! माझ्याजवळ सोट्या आहे तसाच तूही सोट्या घे एक. मग लढू."

तरुणाने एकवार रॉबिनला पायांपासून डोक्यापर्यंत न्याहाळून घेतले. रॉबिनची सूचना त्याला पटल्यासारखी दिसली. शेजारचे एक लहानसे झाडच त्याने मुळासकट उपटले आणि तलवारीने त्याच्या फांद्या छाटून छानशी लाठी बनवली.

आणि मग दोघांचे लाठीयुद्ध सुरू झाले.

त्यात रॉबिनला कळून चुकले, की आपण 'बायकी' समजत होतो तो चांगलाच मर्द गडी आहे! रॉबिनला त्याने असा हात दाखविला, की शेवटी शरवुडच्या नायकालाच जमिनीवर लोळण घ्यावी लागली. बरे झाले, ही गंमत पाहायला त्याचे दुसरे रंगेल गडी नव्हते!

रॉबिनची स्वतःबद्दल एवढी खात्री करून दिल्यावर तो तांबडा तरुण हात झटकीत हसत हसत म्हणाला, "तू रॉबिन हुड ना? मी तुला केव्हाच ओळखलंय! तू मात्र मला ओळखलं नाहीस अजून?"

"म्हणजे?"

"म्हणजे काय? मी तुझा चुलत भाऊ वुइल गेमव्हिल."

"खरं? ....कमाल आहे! किती फरक पडलाय तुझ्यात!" असे म्हणून रॉबिनने त्याला मिठीच मारली.

वुइलने मग त्याला कितीतरी गोष्टी सांगितल्या. सरकारी नोकर सारेच कसे उन्मत्त झाले आहेत आणि अशाच एका नोकराने आपल्या

बापाचा अपमान केल्यामुळे आपण त्याची यमाकडे कशी रवानगी केली आणि तेव्हापासून आपल्यालाही सरकारने 'पुंड' म्हणून कसे जाहीर केले आहे वगैरे हकीकत ऐकून रॉबिनचे हृदय भरून आले. 'मेरियनने तुझा बक्षिसाचा बाण जपून ठेवला आहे आणि ती तुझी नेहमी आठवण काढीत असते,' असे जेव्हा वुइलने सांगितले तेव्हा रॉबिनला धन्य धन्य वाटले.

त्या दिवसापासून 'तांबडा वुइल'ही रॉबिनच्या टोळीत सामील झाला.

दोस्त म्हणून कोणाच्याही गळ्यात हात घालण्यापूर्वी त्याच्याशी दोन हात करायचे हा जणू रॉबिनचा नियमच झालेला होता. टक नावाचा पुजारी आणि प्रेमवेडा ॲलन-अ-डेल ह्यांच्याही बाबतीत तोच अनुभव आला.

टकशी टक्कर झाली ती अशी....

एकदा हिंडून फिरून दमलेला रॉबिन एका ओढ्यापाशी बसला होता. इतक्यात कुठून तरी गाण्याचे सूर त्याच्या कानांवर आदळले आणि गाणे पुरे होते न होते तो दोन माणसे भांडताहेत असा आवाज ऐकू आला.

एक म्हणत होता, "तू काही म्हण, खाऊन खावा तर बदामाचा शिरा!" दुसरा उत्तरला, "एहे रे पुळचट! हरणाचा कबाब तू चाखला तरी आहेस कधी?" पहिल्याने म्हटले, "बदामाबरोबर लोणी मात्र सपाटून मिसळलं पाहिजे." दुसरा आपल्याच तारेत म्हणाला, "कबाबात कांदा मात्र चिरून घालायला हवा!"

रॉबिन ताडदिशी उठून बसला. त्याने कान टवकारले, डोळे ताणले आणि ओठांवरून जीभ फिरवली.

भुकेमुळे रॉबिनच्या पोटात कावळे ओरडत होते. असला वाद ऐकल्यावर त्याच्या तोंडाला पाणी सुटले तर नवल नाही.

तो उठला आणि आवाजाच्या दिशेने गेला.

त्याने जे पाहिले त्यामुळे त्याला एवढे हसू कोसळले, की आपले पोट दाबून खो खो हसत तो मटदिशी खालीच बसला.

दोघांशिवाय भोडण होत नाही म्हणतात ना? इथे तर ओढ्याच्या पैलतीरावर एकच मनुष्य होता आणि तो स्वतःशीच भांडत होता. एकदा तो असा आवाज काढी, एकदा तसा काढी आणि ऐकणाराला वाटे, की दोन माणसे भांडताहेत.

लठ्ठ गोटोळा इसम होता तो; आणि ख्रिस्ती देवळातले पुजारी घालतात तसला लांब झगा अंगात घातलेला होता. झग्याला मध्यभागी कंबरपट्ट्यासारखी जाड रेशमी दोरी होती. स्वारीच्या डोक्यावर सरदार लोक घालीत तसले शिरस्त्राण होते. पण हातात असलेले शस्त्र मात्र विशेष लढाऊ नव्हते. एक भला जंगी मांसाचा कबाब होता तो. त्याने स्वतःशीच घातलेला वाद आता संपलेला असावा. कारण कबाबाचा विजय झालेला होता आणि पुजारीबुवांचे दात आता मोठ्या प्रेमाने कबाबावर तुटून पडणार होते. पण तसे करण्यापूर्वी स्वारीला उकाडा असह्य झाला.

आणि त्याने शिरस्त्राण काढून खाली ठेवले. त्याबरोबर त्याचे अंड्यासारखे गुळगुळीत डोके रॉबिनच्या नजरेला पडले. टकलाच्या खालच्या बाजूला फक्त एक तुरळक कुरळ्या केसांची रांग होती. त्याचे गुबगुबीत लाल गाल उन्हात चमचम करीत होते. गर्दन जाड होती. ओकवृक्षाला फांद्या फुटाव्यात तसे त्याच्या भरदार खांद्यापासून निघालेले त्याचे हात रॉबिनला वाटले आणि ह्या सर्व अवताराला न शोभणारी एक भरभक्कम तलवार जेव्हा रॉबिनने त्याच्या कंबरेला पाहिली तेव्हा त्याला आणखीच हसू कोसळले.

पण त्याने जेव्हा कबाबाचे चावेच घ्यायला सुरुवात केली तेव्हा रॉबिनचे हसू ओसरले आणि राग उसळून आला. आपण एवढे भुकेने कासावीस झालेलो असताना कचाकच्च मांस खाणारा हा शिष्ट कोण, असे

त्याला वाटले. लगेच एक बाण काढून धनुष्याला जोडीत रॉबिन गुरगुरला, "ए भटजीबुवा, चल मला पाठुंगळीला घेऊन पलीकडे!"

गंमत अशी की भटजीबुवांनी लगेच खाणे बाजूला ठेवले आणि "हो हो, जरूर! धर्मात सांगितलंच आहे मुळी, की दुसऱ्याला मदत करावी...." असे म्हणत लगबगीने उठून थब थब करीत ओढा ओलांडून त्याच्यापुढे पाठ वाकवली. रॉबिनला वाटले हा आपल्याला भ्याला! म्हणून खूष होऊन त्याने त्याच्या पाठीवर बसून मानेला विळखा घातला.

अगदी संथपणे एक शब्दही न बोलता भटजीबुवांनी आपले ओझे पलीकडे नेले आणि खाली उतरवले. मग आपला भिजलेला आंगरखा पिळीत बुवा म्हणतात, "झालं काम तुझं? ....आता माझंही काम कर. तुला इकडे यायचं होतं म्हणून मी इकडे पोचवलं. मला तिकडे बसायचंय, तेव्हा तू मला तिकडं पोचवलं पाहिजेस...."

ही भलतीच पीडा आली!

रॉबिन म्हणाला, "पण भटजीबुवा, माझे बूट मोजे भिजतील ना?"

"अस्सं होय?" भटजीबुवा आता आपले खरे रूप दाखवीत म्हणाले, "आणि माझा अंगरखा वरच्या गुंडीपर्यंत भिजवलास तेव्हा काही वाटलं नाही ना तुला? का तुझे मोजे चांदीसोन्याचे केले आहेत?... ते काही नाही. मला पोचवलंच पाहिजे पलीकडे."

"पण भटजीबुवा, तुमचे हे सगळे कपडे, जिरेटोप नि तलवार मिळून टनाचं ओझं होईल!"

"एवढंच ना? मग हा फेकला टोप, ही ठेवली तलवार, हा काढला अंगरखा.... हं, उचल आता."

बिचाऱ्या रॉबिनचा आता इलाज नव्हता. तो वाकला आणि बुवांचे जड ओझे त्याने पाठुंगळीला घेतले. ओढ्यात निसरडे खूप होते आणि गुळगुळीत दगडगोटे नि शेवाळ पण भरपूर होते. त्यातून ठेचाळत,

बुचकळत रॉबिनने बुवांचे गाठोडे एकदाचे पलीकडे नेऊन आदळले. आणि मग काय बोलायचे ते त्याने ठरवून ठेवलेच होते. त्याप्रमाणे तो बोलला.

"बुवा! आता आपल्याला परत नेलं पाहिजे हां तिकडे! ....बघा, बायबलातच सांगितलंय कुणालाही नाकारू नये म्हणून!"



बुवा तोंडावर हात ठेवून नाक फेंदारून त्याच्याकडे पाहू लागले. त्यांना वाटले हा असाच प्रकार चालू राहिला तर हे झेंगट कधी संपायचेच नाही! पण जास्त कमी न बोलता त्याला पुन्हा पुजारीबुवांनी पाठीवर उचलून घेतले आणि ओढ्याच्या मध्यावर आणल्यावर पाय घसरल्याचा आव आणून रॉबिनचे मुटकुळे खुशाल पाण्यात सोडून दिले!

आपली तलवार घेऊन पुजारीबुवा पुन्हा काठावर जाऊन कबाब खात बसलेले पाहून रॉबिन चिडला. पाण्याच्या डबक्यात त्याने दोन गटांगळ्या खाऊन सावरले आणि मग भात्यातून तीर काढून सरासर पुजाऱ्यावर सोडायला सुरुवात केली.

•

पण पुजारीबुवा झटदिशी मान फिरवीत त्यामुळे रॉबिनचा नेम चुके, किंवा मध्येच तो जंगी कबाब धरीत तेव्हा त्यातच तीर घुसून बसे. अखेर रॉबिनचे बाण संपले; पण बुवांच्या केसालाही धक्का लागला नाही. लवकरच कबाब संपवून बुवा उठले आणि आपली तलवार परजून त्यांनी पाण्यात उडी टाकली. रॉबिननेही कंबरेची तलवार उपसली.

आणि मग ओढ्याच्या मध्यावर पाण्याच्या प्रवाहात तासभर अशी चकमकच झडली की ज्याचे नाव ते! सपासप, धबाधब, चपाचप ....हळक, बळक, डुब!

शेवटी रॉबिनचा पाय एका बुळबुळीत दगडावरून निसटला आणि त्याने पाण्यातच लोटांगण घातले.

बुवा खो खो हसले. पण पडलेल्यावर वार करायचा असे त्यांचे ब्रीद नव्हते. तेव्हा तलवार म्यानात घालून त्यांनी रॉबिनचा हात धरून त्याला उठवले.

"ऊठ बच्चा! पुन्हा अशा भानगडीत पडू नकोस.... तुझं वजन ते काय?"

आपले वजन दाखविण्यासाठी रॉबिनने कंबरेचे शिंग काढले आणि बेंबीच्या देठापासून जोरात वाजवले. लगेच चारी दिशांनी झाडीतून त्याचे साठसत्तर रंगेल गडी सोसाट्याने धावत आले आणि त्यांनी ओढ्याच्या दोन्ही काठांवर आपल्या पलटणी उभ्या केल्या.

तोंडाचा चंबू करून बुवांनी आपले आश्चर्य दाखवले. मग ते म्हणाले, "मी वाजवू माझं शिंग?"

रॉबिन चकित होऊन म्हणाला, "वाजवा!"

उजव्या हाताची दोन नि डाव्या हाताची दोन अशी चार बोटे घशात कोंबली, की बुवांचे शिंग तयार होई आणि त्यातून त्यांनी आवाज काढला तो इतका कर्कश होता की त्याने बहिऱ्याचेही कान किटले असते.

•

तो आवाज ऐकून आसपासच्या झाडीतून शेपन्नास मोठाले कुत्रे भुंकत भुंकत आले आणि त्यांनी ह्या मंडळीला गराडा दिला.

रॉबिनच्या दोस्तानी गांगरून आपापले धनुष्यबाण सरसावले, पण बुवा हसत म्हणाले, "घाबरू नका. हे प्राणी तुम्हांला काही करायचे नाहीत...."

रॉबिन आता अगदी हबकूनच गेला होता. त्याने दबलेल्या आवाजात विचारले, "बुवा, आपलं नाव?"

"माझं नाव टक. मी संन्यासी आहे. फाउटनच्या देवळात पुजारी म्हणून काम करीत असतो.... म्हणजे, करीत असे. आता मी हे सैन्य घेऊन तुझ्या टोळीला मिळणार आहे!.... रॉबिन हुडच ना तू?"

बुवांचे शब्द ऐकून रॉबिन हुडच्या रंगेल गड्यांनी त्याच्या नावाचा जयजयकार केला. शरवुडच्या अरण्यात त्या रात्री कबाबांची मजेदार मेजवानी झडली. तिला शंभर एक माणूस आणि तितकाच कुत्रा हजर होता!

बुवा मग तिथेच राहिले. इतर मंडळींबरोबर त्यांच्या घरी मात्र नाही. त्यांनी जवळच स्वतःसाठी एक छोटीशी झोपडी बांधायचे ठरवले.

मनसोक्त जेवण झाल्यावर रात्रीच्या चांदण्यात रॉबिनची स्वारी आळसटपणाने इकडे तिकडे भटकत होती. कोणीही नवखा वाटसरू भेटला, की त्याची कुरापत काढून त्याच्याशी मारामारी करायची रॉबिनला नेहमी खाज असे. पण आज त्याची रग आधीच जिरलेली होती आणि पोटही तुडुंब भरलेले होते; त्यामुळे थोड्याच वेळाने त्याला एक अनोळखी माणूस दिसला तरी रॉबिन त्याच्या वाटेला गेला नाही.

ह्याही माणसाचे कपडे तांबडेलाल होते; पण वुइलसारखा तो सरदारी बाण्याचा दिसला नाही. चेहेऱ्यावरून रूपवान सच्चा माणूस मात्र वाटत

होता. त्याच्या हातात एक सारंगी होती आणि तिच्या तारांवरून बोटे फिरवीत तो तालसुरात एक प्रेमाचे गाणे गात होता.

सुंदर नवरी नखरेबाजऽ।
उद्या तिच्याशी लगीन माझं॥

रॉबिनला मेरियनची आठवण झाली. तो आपल्याशीच म्हणाला, "अशा चांदण्या रात्री ह्या बापड्या प्रेमवीराला आपण त्रास देणार नाही. उद्या लग्न आहे म्हणतोय तर होऊ दे बिचाऱ्याचं सुखानं लग्न!"

पण मुक्कामावर आल्यावर त्याने आपल्या लोकांना एवढे मात्र सांगून ठेवले, की असा हा इसम पुन्हा भेटला तर त्याला आणा माझ्यापुढे!

दुसऱ्याच दिवशी त्याची ती इच्छा पुरी झाली. धाकला जॉन आणि चक्कीवाल्याचा मुलगा मच ह्यांना तो तरूण पुन्हा झाडीतून हिंडताना दिसला. लगेच त्याला पकडून त्यांनी आपल्या नायकापुढे आणून उभा केला. पण आज त्याचा सगळा रंगेलपणा नाहीसा झालेला होता. त्याचा तो लाल डगला फाटून गेला होता, केस पिंजारलेले होते आणि दर पावलागणिक तो अडखळत नि सुस्कारे टाकीत होता.

धाकल्या जॉनने त्याला दटावले, "ए बाळ! आता रडणं बस्स कर."

"ऊं–हूं! ऊं–हूं" त्याने आणखीच हुंदके दिले.

रॉबिनने त्याची समजूत घालीत म्हटले, "अरे, तुझं आज लग्न ना होतं? काल तर तुला मी प्रेमाची गाणी गाताना ऐकलं."

"ऊं–हूं! ऊं–हूं–" तो कण्हला. "ते कालचं काल झालं. काल मी स्वर्गात होतो, आज...."

"ए.... आमच्या शरवुडला नरकबिस्क म्हणशील तर खबरदार!" म्हातारीच्या मोठ्या मुलाने आवाज काढला.

रॉबिन म्हणाला, "नका रे त्याला दटावू.... हे बघ, तू आपली कहाणी तर ऐकव आम्हांला."

तरुणाने आपली कहाणी ऐकवली. त्याचे नाव होते ॲलन-अ-डेल. ज्या मुलीवर त्याचे प्रेम होते तिचा भाऊ मोठा लोभी होता. त्याने तिचे लग्न ठरवले होते एका म्हाताऱ्या सरदाराशी. कारण त्यात त्याला सपाटून पैसे मिळणार होते! त्यामुळे बिचारी ती मुलगी नि ॲलन-अ-डेल दोघेही दुःखीकष्टी झाली होती.

"पण मग त्या थेरड्याला तू तलवारीचं पाणी का नाही दाखवलंस?" रॉबिनने विचारले, "मधून मधून असा पट्टा फिरवायला मिळाला म्हणजे बरं असतं. ....खरं की नाही बुवा?"

"माणसाचे हात म्हणजे जळवा असतात," बुवांनी गंभीरपणे मत दिले, "मधून मधून त्यांना रक्ताची तहान लागायचीच!"

ॲलनने सांगितले, "त्याचे दोन तीन शिपाई मारले मी. पण स्वतः तो सापडत नाही. नेहमी पहाऱ्यात असतो."

"कधी होणार आहे हे लग्न, ॲलन-अ-डेल?"

"आज दुपारी तीन वाजता प्लिम्पटनच्या देवळात. इथून पाच मैलांवर, येईल ते देऊळ!"

"ठीक, तर मग आपला मोर्चा आता प्लिम्पटनकडे. जॉन तू निवडक चोवीस इसम घेऊन दुपारी प्लिम्पटनला हजर राहायचं. मच, तुझ्या सुग्रण हाताने छानदार खीर बनवून ॲलनला भुरके मारायला द्यायची. पोट भरलं, की तो असा सुस्कारा सोडायचा नाही! ....बुइल, तू मग त्याला नवरदेवाचा साज चढवायचा. ....आणि बुवा, तुम्ही बायबल हातांत घेऊन देवळाची वाट धरायची!"

आणि त्याप्रमाणे सर्व बेत जमून आला. स्वतः रॉबिनने दोनच्या सुमाराला ॲलनची सारंगी घेतली आणि प्लिम्पटनच्या देवळावर चाल केली.

दरवाजाशीच राजेसाहेबांच्या मर्जीतले ते लठ्ठेश्वरभटजी उंची झगा नि टोपी घालून हजर होते.

"हे का लग्न लावणार आहेत?" रॉबिन स्वतःशी पुटपुटला, "सोन्याहून पिवळं झालं?"

धीटपणे पुढे होऊन त्याने लट्ठेश्वरला सांगितले, की आपण उत्तम सारंगी वाजवणारे आहो आणि लग्नाच्या ह्या समारंभात गाणे बजावणे करून थोडी करमणूक करण्याची आपली इच्छा आहे.

"काय काय वाजवता येतं तुला?"

"खूप वाजवता येतं. मी वाजवायला लागलो, की रडणारे प्रेमवेडे खिदळायला लागतात. नवऱ्या मुली लग्नाचा मंडप सोडतात नि तिसऱ्याच कुणाचा तरी हात धरून पळ काढतात...."

"म्हणजे आपल्या गाण्याची इतकी छाप पडते एवढंच तुला सांगायचंय ना? बराच विनोदी दिसतोस की!" असे हसत हसत म्हणून लट्ठेश्वरभटजींनी रॉबिनला सारंगी वाजवण्याची परवानगी तर दिली.

थोड्याच वेळात लग्नाची मिरवणूक येताना दिसली. पहिल्याने दहा तिरंदाजांचा जथ्था आला. त्यांनी लाल झगे घातले होते आणि झग्यांना सोन्याची जर होती. ते दहाजण शूर दिसले. पण त्यांच्यामागून येणारा नवरदेव तसा नव्हता.

म्हातारेबुवा एक काठी टेकीत टेकीत फार जपून पावले टाकीत होते. त्यांचे सगळे अंग थरथर कापत होते.

त्यांच्यामागून नवरी मुलगी आली. ती आपल्या भावाच्या हातावर रेलून चालली होती. तिचे मोकळे सोडलेले सोनेरी केस उन्हात चमकत होते. तिचे निळे डोळे म्हणजे कृष्णकमळीची दोन फुलेच होती जणू. समुद्रातल्या शिंपल्याची तांबूस छटा कशी चमकते नि ओसरते, तसे तिच्या गालाचे रंग बदलत होते.

तिचा चेहेराच सांगत होता, की ही मुलगी खूप रडली असावी, पण आता धीर करून आल्या प्रसंगाला तोंड देत असावी. तिच्या दोन बाजूंना

दोन दासी होत्या; त्या अगदी काळ्या नि कुरूप होत्या. त्यांतल्या एकीने नवरीचा झगा उचलून धरला होता आणि दुसरीने हातांत मोठा थोरला फुलांचा तुरा धरला होता.

तो देखावा पाहून रॉबिनच्या तोंडून शब्द निघाले, "नवरानवरीची अशी जोडी मी दुनियेत पाहिलेली नाही."

"चूप रे!" त्याला कोणी तरी दटावले.

लट्ठेश्वरभटजी घाईघाईने झगा सावरीत सामोरे गेले.

मिरवणुकीबरोबर ते देवळात परत आले आणि रॉबिनला म्हणाले, "वाजव रे वाजव!"

"मला सारंगीपेक्षा शिंग छान वाजवता येतं." असे म्हणून रॉबिनने कंबरेला लटकणारे शिंग काढले आणि ते जोरजोराने फुंकले.

लट्ठेश्वरभटजी घाबरले.

"पकडा त्याला! काही तरी दगा दिसतो! हा नक्की रॉबिन हुड असावा."

"फार लवकर ओळख पटली म्हणायची!" रॉबिन हो हो करून हसत म्हणाला, "आपण आता असं करा. गाशा गुंडाळा नि पळा इथून. आमचे खास उपाध्ये तयार आहेत लग्न लावायला!"

एव्हाना नवरदेवाचे कपडे घालून ॲलन-अ-डेल आलाच होता; आणि उंदरांसारखे सगळीकडून चूं चूं करीत ऐंशी तिरंदाज पण जमले होते. त्यांच्यापुढे लट्ठेश्वरभटजींच्या मूठभर लोकांचा काय निभाव लागतो? त्यांनी केव्हाच तेथून पळ काढला आणि मग आमच्या टक संन्याश्याने नवरानवरीचे मोठ्या थाटामाटाने लग्न लावले हे काय सांगायला पाहिजे?

६

अॅलन-अ-डेलचे लग्न लावून रॉबिनने लठ्ठेश्वरभटजीला धडा दिला खरा, पण तेव्हापासून त्याचे शत्रू त्याच्यावर जळायला लागले. "शरवुडच्या अरण्यात तुला त्रास देणार नाही" हे आपले वचन कोतवाल विसरला आणि रॉबिनला हुडकण्यासाठी रान पालथे घालू लागला.

अर्थात त्याच्याबरोबर नेहमीच शंभरदीडशे हत्यारी शिपाई असत. एकदा असेच त्याने रॉबिनच्या टोळीतल्या वीसपंचवीस लोकांना एकीकडे गाठले. बिचारे शौर्याने लढले; पण एवढ्या सैन्यापुढे त्यांचे काय चालणार? भात्यांतले बाण संपल्यावर सारेजण झाडीत पळाले. पण दुर्दैव असे, की म्हातारीचे ते तिघे मुलगे मात्र मागे राहिले. कोतवालाने त्यांना पकडले आणि आपल्याबरोबर नॉटिंगहॅमला नेले.

मग त्याने दवंडी पिटली, की अशा अशा तीन गुडांना आज भर बाजारपेठेत फासावर चढवायचे आहे; ज्यांना गंमत पाहायची असेल त्यांनी या हो या!

म्हातारीला हे कळले, तेव्हा ती रडत रडत रॉबिनकडे गेली. रॉबिन तिला आईसारखा मानायचा. तो लगेच म्हणाला, "काय वाटेल ते करीन, पण त्यांना सोडवून आणीन. काही झालं तरी ते माझे पहिले टोळकरी आहेत." आणि खरोखरीच त्याने म्हटल्याप्रमाणे केले.

फाटके तुटके कपडे घालून, केस पिंजारून, तोंडाला माती फासून, डोळे रागीट करून तो कोतवालाकडे गेला आणि म्हणाला, "मी एक रानटी माणूस आहे. मला मारेकऱ्याची नोकरी देता?"

"अवश्य....अवश्य...." कोतवाल म्हणाला, "आजच तिघा बदमाषांना फाशी द्यायचं आहे. ते काम तूच कर."

आणि रॉबिनने ते काम पत्करले.

दुपारचे बारा वाजले होते. टळटळीत उन्हाची वेळ, पण बरेच लोक फाशी बघायला जमले. तिघाही पुंडांना कोतवालाने फाशीच्या ठिकाणी लाकडी फळीवर उभे केले. तेवढी फळी रॉबिनने ओढून घेण्याचा अवकाश, त्याच्या तिघा सोबत्यांची निर्जीव शरीरे हवेत लटकायला लागली असती.

पण तसे करण्यासाठी रॉबिनने एवढे सोंग आणलेले नव्हते. फाशीच्या त्या उंच जागेवर चढून त्याने पहिली गोष्ट जर कोणती केली असेल तर ती म्हणजे कंबरेचे शिंग काढले आणि फुंकले.

लगेच जिकडे तिकडे आरडाओरड नि धावपळ झाली. रॉबिनच्या रंगेल गड्यांनी एकदम प्रगट होऊन बाणांचा वर्षाव चालवला आणि त्यामुळे लोकांत एकच गडबड नि गोंधळ उडाला.

रॉबिनने आपल्या सोबत्यांच्या दोऱ्या केव्हाच चाकूने कापून टाकल्या होत्या आणि तेही हातांत तलवारी घेऊन कोतवालाच्या लोकांवर तुटून पडले होते.

'कोतवालशाही'ला रगड चोप देऊन झाल्यावर रॉबिनचे लोक हा हा म्हणता आले तसे दिसेनासे झाले.

ह्या पराक्रमामुळे तर रॉबिनचा दरारा आणखीच पसरला. कोतवालसाहेब मग बरेच दिवस त्याच्या वाटेला गेले नाहीत.

रॉबिनची कीर्ती आता इंग्लंडच्या राजापर्यंत पोचली. ह्या पुंडाला पकडून आणील त्याला आपण फार मोठे बक्षीस देऊ असे राजेसाहेबांनी जाहीर केले.



राजाच्या दरबारात एक गिसबोर्नचा गाय म्हणून सरदार होता. त्याचे नाव गाय असले तरी तो गरीब नव्हता, चांगला बैलासारखा मस्त होता. तलवारीचे हात करण्यात नि अचूक निशाणबाजीत त्याचा नेहमी पहिला नंबर असे.

अर्थात शरवुडचे पाणी अजून त्याने चाखलेले नव्हते म्हणून!

हा मस्त सरदार एक दिवस दरबारात म्हणाला, "महाराज, आपण हुकूम करा. असाच्या असा जातो नि त्या पोरकट पुंडाला पकडून आणतो."

राजाला आनंद झाला. त्याने आपल्या सही-शिक्क्याचा एक हुकूम खरडला आणि गायजवळ दिला.

खुद्द राजेसाहेबांचा हुकूम! मग आता काय, गायला चारी दिशा मोकळ्या होत्या.

मोठ्या गर्वाने दंड थोपटून सरदारसाहेब निघाले. पहिल्याने नॉटिंगहॅमच्या कोतवालाकडे आले.

"रॉबिनला पकडायला आलोय मी." त्यांनी राजेसाहेबांचा हुकूम दाखवीत ऐटीने म्हटले.

कोतवालाने मोठ्या गडबडीने सरदारसाहेबांचा मानपान केला.

"किती लोक देऊ तुमच्याबरोबर?" त्याने नम्रपणे विचारले.

“लोक?” गिसबोर्नचा गाय तुच्छतेने बोलला, “माझ्याबरोबर लोक बीक नकोत. पण तुम्ही एवढं करा. पाचपन्नास मंडळी तयारीत असू द्यात. हे माझ्याजवळ चांदीचं शिंग आहे. ते मी वाजवलं, की समजा रॉबिन हुड माझ्या तावडीत आलाय म्हणून! मग ह्या लोकांनी नुसतं यायचं नि त्याला पकडायचं.”

“ठीक,” कोतवाल म्हणाला आणि त्याप्रमाणे त्याने व्यवस्था केली. इकडे काय गंमत झाली....

तांबडा वुइल नि धाकला जॉन आपल्या पंचवीस सोबत्यांना बरोबर घेऊन बाजाराला गेले होते. पण आपल्यावर कोतवालाची नजर आहे हे त्यांना माहीत होते. तेव्हा सापडलोच तर एकदम सगळेजण जाळ्यात सापडू नये म्हणून वुइल एकटाच शहरात गेला आणि जॉन आपल्या मित्रांना घेऊन वेशीपासून दोन मैलांवर एका उंच जागी लपून बसला.

आणि ते फार वेळ बसले नाहीत तोच त्यांना एक चमत्कार दिसला. तोफेतून गोळा सुटावा तसा तांबडा वुइल वेशीतून सो सो करीत बाहेर आला होता. त्याच्या पाठोपाठ कोतवाल आणि त्याचे पन्नाससाठ शिपाई होते. वुइल जो सोसाट्याने पळत आला तो वेशीजवळचा खंदक, डबकी, खड्डे, झाडंझुडपं ह्यांची पर्वा न करता सशासारख्या उड्या मारीत चालला.

त्याच्या सोबत्यांनी पाहिले, की आपल्यापेक्षा ह्या शिपायांची संख्या फारच जास्त दिसते. तेव्हा तेही झाडीत चौफेर पळाले. पण धाकल्या जॉनचे धाडस काही जबरेच! तो पळाला नाही. एकटाच मागे राहिला. त्याने पाहिले, कोतवालाचा एक चपळ शिपाई लांब लांब टांगा टाकीत तांबड्या वुइलला गाठण्याच्या अगदी बेतात आहे. लगेच त्याने आपल्या धनुष्याला बाण जोडला आणि अचूक नेम धरून सोडला.

बाणाने आपले काम केले. शिपाईबुवांनी वुइलचा नाद सोडला आणि दोन्ही हातांनी पोट दाबीत जमिनीवर लोळण घेतली.

पण दुसरे शिपाई लगेच थांबले. बाण कोठून आला हे त्यांनी पाहिले; आणि धाकला जॉन एकटाच आहे एवढे दिसल्याबरोबर मोठमोठ्या गर्जना करीत ते जॉनवर तुटून पडले.

जॉनने लढण्याची शिकस्त केली. पण उपयोग झाला नाही शिपायांनी त्याला पकडले आणि दोऱ्यांनी करकचून बांधले. मग ह्या बड्या कैद्याला घेऊन कोतवालाची स्वारी मोठ्या खुषीने शहराकडे निघाली. कोतवाल खुषीत होता. कारण त्याला माहीत होते, की धाकला जॉन म्हणजे रॉबिन हुडचा उजवा हात आहे. त्याला पकडला म्हणजे रॉबिनचा एक हातच तोडला आपण!

आणि तरी सुद्धा रॉबिनचे लोक कसे नि कोठून येतील आणि धाकल्या जॉनला सोडविण्यासाठी हल्ला करतील त्याचा नेम नव्हता आणि म्हणूनच कोतवालाचे लोक लगबगीने चालले होते.

त्यांना शहरात शिरायचा सुद्धा धीर नव्हता. वेशीजवळच एक टेकडी होती नि टेकडीवर एक झाड होते. त्या झाडावर टांगून धाकल्या जॉनला फाशी द्यावे असे कोतवालाने ठरवले.

जॉनच्या गळ्याभोवती दोर अडकवल्यावर कोतवाल मोठ्या गुर्मीत म्हणतो,

"हं! आता पाहू या कोण तुझा काका मामा येतो तो!"

धाकला जॉन काही बोलला नाही. नुसताच थुंकला.

"एक....दोन...."

पण कोतवालाच्या तोंडातून 'तीन' निघायच्या आधीच दुरून शिंगाचा आवाज ऐकू आला.

फाशीचे काम तसेच थांबले. कोतवाल कान देऊन ऐकायला लागला. पण हे शिंग रॉबिनचे नाही अशी त्याची खात्री झाली. त्याच्या लगेच

लक्षात आले, ....की हे शिंग आहे दरबारातून आलेल्या पक्क्या सरदाराचे! ....गिसबोर्नच्या गायचे!

तेव्हा कोतवालसाहेब खुष झाले व म्हणाले, "हे छान झालं. सरदारसाहेबांनी रॉबिन हुडला पकडलेलं दिसतं! चला रे मंडळी, सरदारांना सामोरे चला आणि ह्या गुंडाला आताच फाशी नका देऊ. त्याचा पुढारी आला म्हणजे एकदम ठेवू दोघांना लोंबकळत!"

त्याप्रमाणे धाकल्या जॉनला त्यांनी नुसताच झाडाला बांधून ठेवला आणि गेले सरदारांना सामोरे.

पण ही काय भानगड आहे? खरोखरीच रॉबिन हुड सापडला होता का? थांबा हं, आपण थोडे मागे जाऊ या.

त्या दिवशी धाकल्या जॉनची नि रॉबिनची झाली होती थोडी बोलाचाली. म्हणजे भांडण होते गमतीचेच, पण त्यामुळे दोघेही एकमेकांवर रुसले होते.

एक फारच विचित्र माणूस त्यांना दिसला होता. दुरून तर त्यांना असेच वाटले, की हा कोणीतरी तीन पायांचा प्राणी आहे! त्यामुळे दोघेही अगदी बुचकळ्यात पडले. पण तीन नाही, तीनशे पायांचा प्राणी जरी आपल्या जंगलात आला तरी त्याला हटकायचे असा ह्या रंगेल टोळीचा बाणा होता. प्राणी दिसतोय अजब, तेव्हा त्याला हटकायचा मानही मोठा; तो तू घेणार का मी ह्याबद्दल रॉबिन नि जॉन ह्यांच्यात भांडण सुरू झाले. शेवटी रॉबिनची पुढारीपणाची ऐट उसळून आली आणि आपल्या दोस्ताला दूर ढकलून तो स्वतः पुढे झाला.

जरा जवळ आल्याबरोबर रॉबिन स्वतःशीच म्हणतो, "अरेच्या! हा तर दिसतोय एक भिकारी! पण घोड्याचं मोठं थोरलं क़ातडं पांघरून त्याने आपली फाटकी लक्तरं लपवली आहेत."

आणि खरोखरच त्याने घोड्याचे कातडे पायघोळ पांघरले होते. कातड्याची घाण सुटली होती; ते पुरते कमावलेले सुद्धा नसावे.

डोक्यावर आला होता घोड्याचा मुखवटा आणि पायांबरोबर शेपूट फरफटत येत होते, त्यामुळे सहज पाहाणाराला वाटे, की हा ह्याचा तिसरा पाय आहे!

"काय चक्करशेट, कोण तुम्ही?"

"मी चक्कर दिसत असेन, पण राजाच्या कामगिरीवर आलो आहे. तू कोण मला 'तुम्ही कोण' म्हणून विचारणारा?"

"मी?.... मी इथला राखणदार आहे. राजेसाहेबांची नि माझी हरणं राखीत असतो मी," रॉबिनने उत्तर दिले.

"अस्सं. मग छान! मला तुझी मदत होईल. अर्धं बक्षीस तुला देईन. मी निघालोय रॉबिन हुडला पकाडायला!"

रॉबिन चमकला. मग स्वतःला सावरून म्हणतो, "का बुवा? रॉबिनने काय घोडं मारलं तुमचं?"

गिसबोर्नच्या गायने एकदम घोड्याचे कातडे काढून टाकले आणि तो म्हणाला, "तुला रे का रॉबिन हुडबद्दल प्रेम एवढं? तू त्याच्या टोळीतला आहेस की काय?"

"छे छे!" रॉबिन बेपर्वाईने म्हणाला, "मी स्वतःच रॉबिन आहे!"

"तर मग हे घे...."

असे म्हणून गायने इतक्या सफाईने म्यानातून तलवार काढून फिरवली, की रॉबिन दचकून मागे झाला म्हणून बरे झाले. नाही तर त्याची भरली होती!

एवढे झाल्यावर रॉबिनला आणखी काय पाहिजे होते? चपळाईने त्याचा हात कंबरेकडे गेला, सळकन तलवार बाहेर आली आणि खळकन शत्रूच्या तलवारीवर आपटली.

आणि मग सणासण, खणाखण, खळाखळ असे तलवारीचे बेफाम द्वंद्व झाले की ज्याचे नाव ते! शरवुडच्या जंगलात पूर्वी अशी चकमक कधी झडली नसेल आणि पुढेही झडायची नाही.

तुम्हांला नाही असं वाटत, की आपण त्या वेळी तिथे असायला पाहिजे होतं नि तो अपूर्व सामना बघायला पाहिजे होता? मला तर वाटतं बुवा! अर्थात एखाद्या झाडाच्या आड सुरक्षित दडून बघायचा!

दोन तासपर्यंत उन्हात तरवारी तळपत होत्या. जणू काही आकाशात लकलकणाऱ्या विजाच, वळवळत फूत्कार सोडणारे सापच. त्यांतली एकही वीज ढगाआड जाईना. एकही साप आपल्या बिळात परतेना.



दोघेही तलवारबहाद्दर होते. पण एक लढत होता आपल्या बचावासाठी नि दुसरा लढत होता बक्षिसासाठी. एक होता धाडसी नि दिलदार. दुसराही होता धाडसी ....पण दगलबाज!

त्यामुळे एकदा झाडाच्या एका खुंटाला अडखळून रॉबिन जेव्हा खाली पडला, तेव्हा सावरासावर करण्यासाठी गायने त्याला वेळ द्यायचा तो दिला नाही. त्याने तडकाफडकी रॉबिनच्या कुशीत वार केला.... आणि मग त्याला वाटले आता रॉबिन कसचा उठतो? म्हणून तो जरा बेफिकीर राहिला. पण कुशीत बसलेल्या वारापेक्षाही रॉबिनच्या मनावर त्याने घाव केला होता. त्याच्या भेकड वागण्याने रॉबिन इतका चिडला.... की डावा हात आपल्या कुशीवर ठेवून उजव्या हाताने त्याने सपदशी तलवार गायच्या छातीत खुपसली.

गिसबोर्नचा गर्विष्ठ गाय मरून पडला.

रॉबिनने खेदाने मान हालवली. तो पुटपुटला, "तूच आपलं मरण ओढवून घेतलंस! नाही तर तुला मारायची माझी मुळीच इच्छा नव्हती."

गायचे कपडे काढून टाकून रॉबिनने आपले कपडे त्याला घातले आणि घोड्याचे कातडे स्वतः पांघरले. तो नि गाय सारख्याच उंचीचे होते आणि गायचे तोंड जखमांनी नि मातीने इतके बरबटले होते, की त्याची खरी ओळख पटणे आता कठीणच होते. रॉबिनची स्वतःची जखम मोठी नव्हती. ती पुसून पट्टी बांधून रॉबिन निघाला आणि जंगलाच्या शिवेवर येताच त्याने गिसबोर्नच्या गायचे चांदीचे शिंग वाजवले.

ते ऐकल्याबरोबर कोतवाल कसा चमकला, धाकल्या जॉनची फाशी कशी थबकली आणि शिपाई रॉबिनला कसे सामोरे गेले ते आपण पाहिलेच आहे.

"रॉबिनला मारलं? छान झालं!" कोतवाल पुढे होऊन त्याचा हात दाबीत म्हणाला, "आता ते फेंगडं रूप फेकून द्या ना सरदारसाहेब!"

"असू दे जरा वेळ."

"तुमची मर्जी!" असे हसत हसत म्हणून कोतवाल आपल्या शिपायांकडे वळून म्हणाला, "तुमच्यापैकी दोघे जण जा रे रानात ....तो कुत्रा कुठे मरून पडलाय त्याला पुरा आणि बाकीचे चला माझ्याबरोबर फाशीच्या तिकडे."

"फाशी?" रॉबिन आश्चर्याने म्हणाला, "कुणाला फाशी देताय?"

"वा! तुम्हांला माहीत नाही का?" कोतवाल मिशा पिळीत म्हणाला, "तुम्ही तिकडे रॉबिनचा बळी घेतलात त्याच्या आधीच आम्ही त्याचा उजवा हात तोडलाय! धाकल्या जॉनला फाशी देतोय!"

रॉबिनच्या काळजाचे पाणी पाणी झाले! आजच आपण जॉनशी भांडलेले आणि आजच हा असा प्रकार घडतो आहे!

पण त्याने बाहेरून काही दाखवले नाही. तो नुसते एवढेच म्हणाला, "चला तर!"

कोतवालाने पाहिले, सरदारसाहेब जखमी झालेले आहेत. तेव्हा त्याने आपला एक खास घोडा त्यांना बसायला दिला. सरदारांनी मेलेल्या घोड्याचे कातडे फेकले आणि जिवंत घोड्यावर बसून टांग मारली.

"का हो सरदारसाहेब, एवढी घाई कसली?"

"घाई?" रॉबिन ओरडून म्हणाला, "रॉबिन हुडला मी मारावं नि त्याच्या जोडीदाराला मात्र फाशी द्यावं तुम्ही! हा बरा न्याय आहे! ते काही नाही. मी पुढे जाऊन आपल्या हाताने त्याला फाशी देणार!"

"उत्तम....उत्तम!" कोतवाल हसत हसत ओरडला. तो आज अगदी खुषीत होता.

त्याने अगदी आनंदाने फाशीचे काम ह्या तोतया 'गाय'कडे सोपवले आणि 'गाय'ने ते कसे पार पाडले, ते आपण पाहू या.

तलवार काढून त्याने पहिल्याने सटासट झाडाला बांधलेल्या दोऱ्या कापल्या आणि धाकल्या जॉनला मोकळा केला. मग जास्त वेळ न घालवता कंबरेचे शिंग काढून त्याने एवढ्या मोठमोठ्याने फुंकले, की खुद्द कोतवालानेही कानांत बोटे घातली.

पण नुसती कानांत बोटे घालून उभे राहाणे त्याला शक्य नव्हते. कारण चहूकडून रॉबिनचे सोबती बाणांचा पाऊस पाडीत होते. तो चुकवून पळता पळता कोतवालाला नि त्याच्या शिपायांना पुरेवाट झाली.

## ७



एक दिवस रॉबिनला काय लहर लागली....बावळटासारखा वेष करून तो शिकारीला निघाला.

सकाळची सुंदर वेळ होती. रॉबिनच्या मनात एकाएकी मेरियनचे विचार येऊ लागले. त्याला वाटले, आज आपली आवडती मेरियन आपल्याबरोबर असती तर....

पण किती झाले तरी रॉबिन हाडाचा शिकारी होता. त्यामुळे समोरून एक चांगले गलेलठ्ठ हरिण येताना दिसले तेव्हा त्याने लगेच धनुष्याला बाण जोडला आणि आता दोरी ओढणार तोच....

उलट दिशेने एक तीर सूं सूं करीत आला आणि हरणाच्या पाठीत घुसला. हरणाने एक किंकाळी फोडली आणि मान हलवीत तंगड्या झाडीत ते जे पडले ते पुन्हा उठलेच नाही.

त्याच्या पाठोपाठ एक लहानसा तरुण उड्या मारीत तेथे आला आणि हरिण पडलेले पाहून त्याच्याजवळ वाकला.

लहानसा म्हणायचे कारण असे, की तो अंगाने अगदीच किरकोळ होता. वयानेही पोरगेला असेल. दिसायला तो फार देखणा होता. त्याचे

गोरे गोरे हात इतके नाजूक होते, की त्यांना एवढे मोठे धनुष्य कसे पेलत असेल ह्याचे रॉबिनला नवल वाटले. पण त्याच्या हातात धनुष्य तर होतेच, शिवाय कंबरेला एक तलवार लटकत होती.

रॉबिन आश्चर्याने थक्कच झाला. पण लगेच पुढे होऊन त्याला दरडावून म्हणतो, "कोण रे तू? ही राजेसाहेबांची हरणं आहेत, माहीत नाही का तुला?"

मुलगा मुळीच घाबरला नाही. उलट जागचा उठून तलवारीकडे हात नेत जोराने म्हणाला, "राजेसाहेबांना हरणं मारायचा जितका अधिकार आहे तितकाच मलाही आहे!... तू कोण मला विचारणारा?"

त्याचा आवाज फार मधुर होता आणि काय असेल ते असो, तो ऐकताना रॉबिनला असे वाटले, की कसल्यातरी जुन्या पुसट आठवणी आपल्याला होत आहेत. पण कसल्या ते मात्र समजत नाही. त्याने त्या मुलाकडे रोखून पाहिले. पण मुलगा चांगलाच धीट दिसला. त्यानेही तितकेच रोखून रॉबिनकडे पाहिले.

पण एक क्षणभरच. लगेच रॉबिनचा सगळा गर्व उसळून आला. त्याला वाटले शरवुडचे जंगल आपले आहे. त्यात आपल्याशी उद्धटपणाने बोलणारा हा कोण उपटसुंभ?

"का रे? फारशी जीभ चुरुचुरू करतेय?" त्याने दम दिला, "आमच्या जंगलचे कायदे तुला माहीत नाहीत असं दिसतं!"

"अरे जा जा!.... माहीत आहेत तुझे कायदे!" असे म्हणून त्या पोराने इतक्या झटदिशी म्यानातून तलवार बाहेर काढली, की तो झपाटा पाहून रॉबिनचे डोळेच दिपले. पण आता त्यालाही आपली तलवार काढणे भाग होते.

थोडाच वेळ झटापट झाली. रॉबिन थोडा अंग चोरूनच लढत होता. उगाच जास्त कमी झाले तर ह्या पोराची खांडोळी उडायची, असे त्याला भय वाटत होते. पोरगा मात्र जोराजोरात नि मोठ्या शौर्याने लढत होता.

शेवटी शेवटी रॉबिनला वाटले, जाऊ द्या, इतका हिरिरीने लढतोय बापडा तर एखादा हात त्यालाच मिळू द्यावा! म्हणून त्याने आपण होऊन पड खाल्ली आणि मनगटावर वार घेतला. थोडीशी जखम झाली आणि त्यातून रक्ताचा एक बारीक ओघळ वाहू लागला.

रक्त पाहून मात्र तो मुलगा जरा दचकला आणि एकदम तलवार आटोपती घेऊन म्हणतो, "झालं तुझं समाधान?"

"नाही झालं," रॉबिन त्याच्याकडे जास्तच रोखून पाहात म्हणाला, "तू कोण आहेस?"

"मी राणीसाहेबांचा एक सेवक आहे. तू कोण?"

हे बोलता बोलता त्या मुलाने अंगरख्याच्या खिशातून एक छोटा रुमाल काढला होता आणि त्याने आपल्या तलवारीच्या पात्यावरचे रक्त पुसले होते. आता आपला माल तो परत ठेवणार तोच रॉबिनचे लक्ष तिकडे गेले.

अंगरख्याच्या आतल्या खिशातून एक सोन्याची वस्तू लखकन चमकली. रॉबिनने ती वस्तू तेव्हाच ओळखली. नॉटिंगहॅमच्या शर्यतीत आपण जो सोन्याचा बाण जिंकला आणि लगेच मेरियनला भेट दिला, तोच हा बाण!

म्हणजे? हा मुलगा....

"तरी मला वाटलंच!" रॉबिन एकदम आनंदाने ओरडला, "मेरियन! तू इकडे कशी?"

खरोखरीच पुरुषाचा वेष घेतलेली ती मेरियन होती. आता रॉबिनने तिला ओळखले. पण तिने मात्र रॉबिनला अजून ओळखले नव्हते.

त्याची दाढी वाढलेली होती आणि त्याने आज पोषाखही अगदी बावळटासारखा केलेला होता.

शिवाय.... रॉबिनची नि तिची ताटातूट झाली त्याला थोडी का वर्षे लोटली होती?

पण आता ओळख पटल्यावर दोघांनाही खूप आनंद झाला. रॉबिनच्या हातातून आपण रक्त काढले म्हणून मेरियनला सारखी हळहळ वाटत होती. तिने आपला नाजूक हातरुमाल काढला.

"काय पण? ह्याच्या दसपट जखमांचं मला काही वाटत नाही!" रॉबिन म्हणाला, पण त्याने मेरियनला रुमालाची पट्टी मात्र खुशाल बांधू दिली.

मग एकमेकांचा हात धरून दोघे रॉबिनच्या 'घरा'कडे निघाली. वाटेत त्यांच्या गप्पांना नुसता पूर आला होता. किती बोलू नि काय बोलू असे त्यांना झाले होते.

रॉबिनचे रंगेल मित्र त्याची वाटच पाहात होते. त्याने आपल्याबरोबर एक नवाच तरुण आणलेला पाहून सारेजण आश्चर्याने त्याच्या भोवती जमा झाले आणि रॉबिनने जेव्हा मेरियनची सगळ्यांशी ओळख करून दिली, तेव्हा त्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही. ॲलन-अ-डेलच्या बायकोला तर, आपल्या नव्या मैत्रिणीला कुठे ठेवू नि कुठे नाही असे झाले.

मग मेरियनने राणीकडून खास निरोप आणला होता तो रॉबिनने सर्वांना सांगितला.

तो म्हणाला, "लंडन शहरात निशाणबाजीचे सामने व्हायचे आहेत. त्यात राजेसाहेबांच्या नोकरीतले खास तिरंदाज भाग घेणार आहेत. राणीसाहेबांची इच्छा आहे, की आपल्या बाजूने कोणी तरी सामन्यात भाग घ्यावा. आपल्या टोळीचे पराक्रम राणीसाहेबांच्या कानांवर गेलेले आहेत. (इथे सर्वांनी कडकडून टाळ्या दिल्या!)

"आणि राणीसाहेबांचं म्हणणं असं, की रॉबिन हुडने आपले चार जोडीदार घेऊन लंडनला यावं आणि आपले खास तिरंदाज म्हणून सामन्यात भाग घ्यावा. रॉबिन हुड पुंड असला तरी राजेसाहेबांकडून आपण त्याला अभय मिळवून देऊ!"

हा संदेश ऐकल्याबरोबर सर्वांनी रॉबिनचा जयजयकार केला. रॉबिन पुढे म्हणाला, "तेव्हा मी उद्या लंडनला जायचं ठरवलं आहे. माझ्याबरोबर मी धाकला जॉन, विली स्ट्यूटली, तांबडा वुइल नि ॲलन-अ-डेल ह्यांना घेऊन जाणार आहे. ॲलनच्या बायकोनेही मेरियनला सोबत म्हणून आमच्याबरोबर यावं. बाकीच्यांनी सावधगिरीने इथेच राहावं. चक्कीवाल्याचे चिरंजीव मच हे पुढारी म्हणून काम पाहातील आणि टोळीच्या पोटाची नि आत्म्याची व्यवस्था टकबुवांकडे राहील!"

त्या रात्री नाजूक पाहुण्यासाठी शरवुडच्या रानात मोठी सुग्रास मेजवानी झडली. मेरियनने मारलेल्या हरणाचे रुचकर घास बनले आणि भुकेल्या पोटांत जाऊन बसले. मेरियन, ॲलनची बायको नि मच ह्यांनी सैंपाक मोठा सुंदर केला होता आणि मसाला नीट लागला आहे की नाही हे पाहाण्यासाठी संन्यासीबुवा टक मधून मधून मसाला चाखीत होते.

जेवण झाल्यावर ॲलनने सारंगी वाजवली, तांबड्या वुइलने गाणे म्हटले आणि मचने भसाड्या सुरात त्याला साथ दिली. पहाटेपर्यंत अशी नाचगाण्याची गंमत चालली होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी रॉबिन हुड आपल्या चौघा दोस्तांना, मेरियनला नि ॲलनच्या बायकोला घेऊन लंडनला निघाला. सर्वांनी आपल्याजवळचे उत्तमातले उत्तम कपडे घातले होते. जिल्हई दिलेले उत्तम तीर नि तिरकमठे बरोबर घेतले होते आणि तलवारी पण चांगल्या परजून म्यानात घातल्या होत्या.

रॉबिनचे सोबती जंगलाच्या शिवेपर्यंत त्यांना पोचवायला आले होते. मग त्यांनी जयजयकार करून त्यांना निरोप दिला.



# ८

राजधानीला रॉबिन हुडची ती पहिलीच भेट होती. तेथले मोठमोठे रस्ते, उंच इमारती, लोकांचे झकपक पोषाख नि लग्नघाई पाहून ह्या रांगड्या वीरांना गंमत वाटली.

खुद्द राणीसाहेबांनीच बोलावलेले, त्यामुळे राजवाड्यात त्यांचा सत्कार छान झाला. राजेसाहेबांना मात्र शर्यतीच्या दिवसापर्यंत ही मंडळी कोण आहेत ह्याचा पत्ता लागला नाही. शेकडो लोक राजवाड्यात येत जात, त्या सर्वांकडे थोडेच राजेसाहेब पाहाणार होते?

सामन्याचा दिवस उगवला. शहराबाहेर एक अफाट मैदान शर्यतीसाठी सजवले होते. लोकांची झिम्मड उडाली होती. त्यातच चार पैसे मिळाले तर मिळवावेत म्हणून सुका मेवा नि फळे विकणारे गलका करीत होते. सर्कशीच्या तंबूत प्रेक्षकांना बसण्यासाठी जशा लांबच लांब फळकुटाच्या जागा बनवतात, तशा मैदानाच्या तीन बाजूंना बैठका तयार केल्या होत्या. राजघराण्यातील मंडळींसाठी अगदी पुढे उंची आसने

राखून ठेवली होती. त्यांच्या मागल्या रांगा मानकऱ्यांसाठी होत्या. उन्हापावसाचा त्रास होऊ नये म्हणून शामियाने ठोकले होते, त्यांच्या किनखापी झालरी डौलाने लोंबत होत्या. ठिकठिकाणी ऐटबाज झेंडे उभारले होते आणि दोऱ्यांवरून रंगीत पताका फडफडत होत्या. शर्यतीत भाग घेणाऱ्या तिरंदाजांसाठी वेगवेगळे छोटे तंबू उभे केले होते.

हळूहळू प्रेक्षक जमायला लागले. रावांपासून रंकांपर्यंत हजारो लोकांनी मैदान फुलले. सरदार दरकदार आपापल्या मानाप्रमाणे बसले.

थोड्याच वेळात भपकेबाज ललकाऱ्या, घोड्यावर दौडत आला. सोनेरी किनखापाचा लालभडक वेश त्याने केला होता. त्याने बिगुल काढून फुंकले. त्या बिगुलालाही सोन्याचे वस्त्र गुंडाळले होते आणि त्याच्या झिळमिळ्या खाली लोंबत होत्या. सरकारस्वाऱ्या आल्याची ती खूण होती. ललकाऱ्याच्या मागोमाग दरबारी ध्वज घेतलेले शिपाई आले आणि त्यांच्या मागोमाग दोन पांढऱ्या शुभ्र घोड्यांवर स्वार झालेली राजाराणी आली. लगेच लोकांनी उठून त्यांचा जयजयकार केला.

पुन्हा सर्व मंडळी बसल्यावर शर्यतींना सुरुवात झाली.

राजेसाहेबांचे खास तिरंदाजच दोनशे होते. वीसजणांचे एक पथक अशी त्यांची दहा पथके केलेली होती आणि प्रत्येक पथकासाठी एक स्वतंत्र तंबू होता. प्रत्येक पथकाला वेगळ्या रंगाचा बावटा होता. त्यांतला टेपस नावाचा तिरंदाज देशभर नावाजलेला होता. त्याचा बावटा होता जांभळ्या रंगाचा. महाराजांचा तो अगदी उजवा हात. दुसरा बकिंगहॅम परगण्यातला क्लिफ्टन.... त्याचा बावटा पिवळा होता. ह्याशिवाय वेल्समधून आलेल्या एल्विनचा हिरवा बावटा, नॉटिंगहॅमच्या गिल्बर्टचा निळा बावटा, क्लाइड्सडेलच्या रॉबर्टचा पांढरा बावटा.... हे सर्व बावटे त्यांच्या त्यांच्या तंबूवर फडकत होते. खरी शर्यत राजेसाहेबांच्या दहा पथकांतच व्हायची. कारण लोकांना वाटे, कसले पट्टीचे तिरंदाज हे! ह्यांच्याशी सामना द्यायला धजणार कोण?

पुन्हा एकदा ललकाऱ्याने बिगुल वाजवले आणि सर्वांना 'शांत राहा, शांत राहा,' म्हणून सांगितले.

"टेपस, पुढे ये," राजेसाहेब स्वतः म्हणाले, "आणि अंतरं मोजून घे."

राणीने सहज विचारले, "बक्षिसं काय ठेवली आहेत महाराज?"

"ती आता ललकाऱ्या जाहीर करीलच. पण आम्ही ठरवलंय ते असं.... पहिल्या नंबराला चाळीस सोन्याची नाणी मिळतील. दुसऱ्या नंबराला चाळीस चांदीची नाणी तिसऱ्या नंबरला एक लहानसं चांदीचं बिगुल. आमचे तिरंदाज पहिले आले तर खुष होऊन आम्ही सर्वांना जेवण देऊ. त्यासाठी पाच लठ्ठ लठ्ठ हरणं मारली आहेत आणि चार टन दारू पण मागवली आहे.... कसा काय आहे बेत?" राजेसाहेब खुषीत येऊन हसत म्हणाले.

"छान," राणी म्हणाली.



क्लिफ्टन हा राजेसाहेबांचा लाडका गडी. टेपस हातांत दोरी घेऊन अंतर मोजतो आहे असे पाहून तो ऐटीत म्हणाला, "अंतर बिंतर मोजता कशाला?.... सरकार, आपण नुसता हुकूम द्या.... चंद्रावर बाण मारतो! किंवा.... आत्ता दिवसाची वेळ आहे म्हणून.... सूर्यावर बाण मारतो!"

"नको. इतक्या लांब जायला नको," राजेसाहेब त्याच्या

पाठीवर थाप मारून बोलले. अंतर मोजून झाले. दहा लाकडी फळे होते. तीच माऱ्याची निशाणे. ती सगळी एका रांगेत सारख्या अंतरावर ठेवली. एकेका फळ्यावर एकेका पथकाचा रंगीत झेंडा रोवून ठेवला.

महाराज बसले होते तेथून जवळच चुनखडीची ठळक रेघ ओढली होती. तेथूनच तिरंदाज नेम धरणार होते.

पहिल्याने दरबारी पथकांतले गडी रेघेवर एकामागे एक असे उभे राहिले. ललकाऱ्याने बिगुल फुंकले.

तो म्हणाला, ''ऐका हो ऐका! राजेसाहेबांचे हुश्शार गडी आता निशाणबाजी करत्याल! जे धा गडी पहिले येत्याल ते जितले हो जितले!''

आणि मग ललकाऱ्याने 'एक....दोन....तीन' म्हणताच दाही निशाणांवर एकदम सरबत्ती सुरू झाली. बाणांचा वर्षाव इतक्या सरसर होत होता, की केव्हा ओरडावे नि केव्हा टाळ्या पिटाव्या हेच प्रेक्षकांना समजेना. मंत्राने भारल्यासारखे ते हा चमत्कार बघत होते. प्रत्येकाला तीन वेळा बाण मारायची संधी मिळत होती. दोघांत बरोबरी झाली तर त्यांना पुन्हा तीनदा मारायला मिळे. कारण कित्येकदा व्हायचे काय, की पुढच्या तिरंदाजाचा बाण निशाणावर जाऊन आपटतो न आपटतो तो मागच्याचा बाण येऊन नेमका त्याला छेदून जाई! शर्यत संपली तेव्हा फळ्यावर बाणांचे गुच्छच्या गुच्छ चिकटल्यासारखे दिसले. घोटाळा होऊ नये म्हणून प्रत्येक बाणावर नंबर घातलेला होता.

दरबारी शर्यत पुरी झाली आणि आता खुले सामने सुरू झाले.

खुले सामने म्हणजे असे, की आता शर्यतीत भाग घ्यायला कोणालाही परवानगी होती. पण राजेसाहेबांच्या गड्यांचा पराक्रम लोकांनी आता पाहिलाच होता. त्यांतल्या पहिले आलेल्या दहा नंबरांशी आता सामना द्यायचा होता. एवढे धाडस करणार कोण?

पण तरी सुद्धा तसे बारा धाडसी वीर निघाले!

राजेसाहेबांनी आपल्या दाढीचे खुंट कुरवाळले आणि बारीक डोळ्यांनी त्यांच्याकडे पाहात म्हटले, "साहस जबरं ह्यांचं, ह्यात शंका नाही!"

राणी हळूच म्हणाली, "तुम्हांला काय वाटतं, तुमच्या ह्या दहा गड्यांना वरचढ असा कोणी नसेल इंग्लंडमध्ये?"

"इंग्लंडमध्ये?" राजा तुच्छतेने म्हणाला, "जगात तरी आहे की नाही, मला शंका वाटते."

"मग ती शंका फेडायला मी तयार आहे. केवढ्याची पैज, बोला?"

राणी स्वतः पैज मारायला निघालेली पाहून राजेसाहेब अगदी रंगात आले. "पैज?.... मी पाचशे पौंडांची पैज मारायला तयार आहे! पण भलत्या भानगडीत कशाला पडता तुम्ही, राणीसाहेब?"

"त्याच्याशी तुम्हांला काय करायचंय? मी आत्ता उभे करीन असे पाच गडी!.... पण मला एक वचन पाहिजे."

"ते कोणतं?"

"त्या लोकांना तुम्ही अभय दिलं पाहिजे."

"अर्थात! त्याबद्दल शंका आहे की काय?"

पण राणीचे तेवढ्याने समाधान झाले नाही. ती हसत हसत म्हणाली, "आपल्या ह्या पैजेला साक्षीदार हवेत कुणीतरी. छोकरा, सर रिचर्डना बोलाव पाहू आणि लट्ठेश्वरभटजींना पण."

दोघे आले. सर रिचर्ड हा नॉटिंगहॅम टापूतलाच एक सरदार होता.

"सर रिचर्ड, तुमचं काय मत आहे? टेपस नि गिलबर्ट ह्यांच्या तोडीचे तिरंदाज मिळतील की नाही?"

रिचर्डने राणीपुढे गुडघे टेकले आणि तो म्हणाला, "त्यांची बरोबरी कोण करणार सरकार!.... पण मी असं ऐकलं आहे, की शरवुडच्या जंगलात काही तरुण लपून राहातात. ते म्हणे नेमबाजीत कुणाला हार जायचे नाहीत."

राणी हसली. मग तिने लट्ठेश्वरभटजींना विचारले, "भटजी, तुम्हांला काय वाटतं? पैज लावावी महाराजांशी?"

"छे. छे. भलतंच!" लट्ठेश्वरभटजींने कानांवर हात ठेवले. "टेपस-क्लिफ्टन-गिलबर्ट! अशा लोकांशी टक्कर द्यायची? अशक्य! अशक्य! राणीसाहेब, अशा भलत्या पैजा आपण मारू नयेत."

"इतके अजिंक्य आहेत ते?" राणी हसत म्हणाली, "पण मी तर लावणार बुवा पैज! नॉटिंगहॅम नि प्लिम्पटनच्या आसपास असले तिरंदाज रगड आहेत म्हणे!"

प्लिम्पटन नाव ऐकल्याबरोबर भटजी चमकले. तो लग्नात झालेला घोटाळा नि आपली फजिती राणीसाहेबांच्या कानावर गेली असावी हे त्यांनी ओळखले. पण उघड काय बोलणार? उघड एवढेच बोलले, "त्यात काही अर्थ नाही राणीसाहेब. त्या सगळ्या गप्पा आहेत. त्यातून आपण पैज लावणारच असाल तर राजेसाहेबांच्या बाजूने माझे आणखी शंभर पौंड!"

राणीला राग येऊ नये म्हणून लट्ठेश्वरभटजी हे हसत हसत बोलला होता. पण मनातून त्याला धागधूग वाटत होती.

राणीने मेरियनला खूण केली. मेरियन उठून गेली.

इकडे दरबारी तिरंदाज नि ते बाराजण ह्यांच्यातली शर्यत सुरू झाली होती. ते गडी देखील चांगले कसलेले होते. पण एक तर लंडनसारख्या शहरात बड्या मंडळींपुढे खेळायची त्यांना सवय नव्हती. त्यामुळे बिचारे बुजले होते. त्यांच्या बाजूने टाळ्या पिटायलाही कोणी नव्हते. त्यामुळे त्यांच्यापैकी प्रत्येकाने अगदी शिताफीने बाण सोडले तरी अखेर राजेसाहेबांच्या गड्यांपुढे त्यांना हार खावी लागली.

गिलबर्ट पहिला आला. तीळभर अंतराने टेपसचा पहिला नंबर गेला. ह्या दोघांच्या मागोमाग एलविन, जॉफ्रि नि क्लिफ्टन ह्यांचे नंबर लागले. प्रेक्षकांनी टाळ्या पिटून हुल्लड केली. त्यांना वाटले, झाल्या शर्यती;

आपल्याला वाटले होते तसेच झाले. काही झाले तरी इंग्लंडच्या राजाचे खास तिरंदाज ते. त्यांच्यावर कडी करणे सोपे का काम आहे? त्यामुळे आता बक्षिसे वाटायला सुरुवात होईल, अशीच लोकांची कल्पना होती. पण तसे झाले नाही.

ललकाऱ्या पुढे आला नि त्याने जाहीर केले,

"अजून एक सामना व्हायचा आहे. आता जिंकलेल्या लोकांशी लढायला राणीसाहेबांनी पाच तिरंदाज तयार केले आहेत. तेव्हा ही अपूर्व शर्यत पाहा हो पाहा!"

ह्या बातमीने सगळीकडे खळबळ उडाली! लोक आपापसात कुजबुजू लागले, तर्कवितर्क करू लागले. राणीसाहेब राजेसाहेबांशी पैज मारताहेत म्हणायच्या! वाः.... छान! मोठी गंमतच आहे!.... पण कोण बरे असतील हे राणीसाहेबांचे तिरंदाज? आपले तर बुवा डोके चालत नाही....

आणि मग जो तो आपले डोके चालवू लागला.

कोणी म्हणे, आपल्याला माहीत आहेत ते लोक; पण आपण एवढ्यात त्यांची नावे फोडणार नाही! कोणी म्हणे, कोणी का असेनात, दरबारी तिरंदाजांचा पराभव करणे त्यांना शक्य नाही.... अगदी दगडावरची रेघ! तर आणखी कोणी असेही म्हणे, की राणीसाहेबांनी एवढे धाडस केले आहे ते उगाच नाही. त्यांना खात्रीच आहे आपल्या गड्यांबद्दल!

एक ना दोन.... शेकडो तर्क झाले आणि प्रेक्षकांनी आपापसात पैजाही मारल्या. पण इतक्यात पांढऱ्या घोड्यावर बसलेली मेरियन स्वतः सरकारस्वारीपुढे आली. तिच्याबरोबर पाच तरुण चालत आले. त्यातल्या चौघांचा पोशाख हिरव्या रंगाचा होता. पाचवा तरुण त्यांचा पुढारी दिसला. त्याने मात्र तांबड्या लाल मखमलीचा पोषाख केला होता. प्रत्येकापाशी एक मजबूत धनुष्य नि एक बाणांचा भाता होता. त्यांनी आल्याबरोबर पहिल्याने राजाराणींना मुजरे केले.

मेरियनने त्यांची ओळख करून दिली.

पण जवळ बसलेला लठ्ठेश्वरभटजी रागाने लाल झाला. त्याचे आधीचे गुबगुबीत गाल आता आणखीच गोटोळे झाले.

तो कसाबसा पुढे होऊन थर थर कापत म्हणाला, "हे काय?.... हीच का आपली शूर माणसं? राणीसाहेब, हे लोक कोण आहेत माहीत आहे का आपल्याला?.... हे पाचही इसम पुंड आहेत पुंड! हा त्यांचा म्होरक्या रॉबिन हुड, हा धटिंगण धाकला जॉन, तो विली स्ट्यूटली, हा सारंगीवाला ॲलन-अ-डेल ....म.....म....म....म"

पण लठ्ठेश्वरभटजीचा संताप इतका अनावर झाला होता, की त्यांच्या तोंडून नीट शब्दही फुटेना.

रॉबिनच्या टोळीची नावे राजेसाहेबांच्याही माहितीची होती. त्यामुळे त्यांनी चपापून राणीकडे पाहिले.

राणीसाहेबांनी मान डोलवली.

त्या म्हणाल्या, "अगदी खरं आहे भटजी सांगतात ते. पण ते सांगताना त्यांची एवढी फे फे का उडावी ते मात्र त्यांचं त्यांना माहीत! ....पण ते जाऊ द्या! महाराज, आपलं वचन लक्षात आहे ना? त्यांना शर्यतीत खेळू दिलं पाहिजे.

"अर्थात!" राजा मनातून जळत होता; तरी ताडदिशी म्हणाला, "बरं का रे पुंडांनो, वचन दिल्याप्रमाणे मी तुम्हांला माफी देईन, पण चाळीस दिवस. चाळीस दिवस सरकारकडून तुम्हांला अडथळा व्हायचा नाही. तेवढी मुदत संपल्यावर मात्र तुमचे हाल कुत्रा खायचा नाही लक्षात ठेवा!"

रॉबिन किंवा त्याचे सोबती काहीच बोलले नाहीत. कदाचित त्यांना टक संन्याश्याच्या त्या कुत्र्यांची आठवण झाली असेल! त्यांनी मुकाट्याने खाली वाकून पुन्हा एक मुजरा केला. मग ललकाऱ्याने खूण करताच तिघेही चुनखडीच्या रेषेवर जाऊन उभे राहिले.

दुसऱ्याच क्षणी तिरकमठ्याचा टणत्कार ऐकू आला.

शरवुडच्या टोळीपैकी धाकल्या जॉनने धनुष्याची दोरी ताणल्याचा तो आवाज होता!

राजेसाहेब टेपसच्या कानाला लागून म्हणाले, "टेपस, लक्षात ठेव. तुझ्यावर माझी सगळी मदार आहे.... तुझ्यावर नि तुझ्या चौघा दोस्तांवर. बाजू राखलीत तर तुमच्या टोप्या भरभरून चांदी सोनं देईन तुम्हांला. पहिला येईल त्याला तर सरदारकी देईन. पण जर का हरलात, तर.... तर काय म्हणा? ह्या पुंडांना बक्षीसं देणं भागच आहे मला!"

रॉबिन हुडचे नाव सर्वांनी ऐकलेलेच होते. त्यामुळे त्याचे नि त्याच्या टोळीचे टाळ्यांनी स्वागत झाले.

मग दोन्ही टोळ्यांचे म्होरके पुढे झाले.... रॉबिन आणि गिलबर्ट. त्यांनी ओली सुकी केली; ती गिलबर्टने जिंकली.

गिलबर्टने हुकूम दिला, "क्लिफ्टन, तू मार पहिला बाण."

डावा पाय पुढे नि उजवा पाय मागे अशा पवित्र्यात क्लिफ्टन उभा राहिला. त्याने बाण काढून धनुष्याला जोडला आणि दोरी ताणली.

क्लिफ्टनने ठरवले होते, की आपली असेल नसेल तेवढी हुशारी आता दाखवायची. आतापर्यंत आपण जिंकलो खरे पण नंबर ढेगच आला आपला! आता असे उपयोगाचे नाही!

आणि खरोखरीच 'तीन' म्हटल्या बरोबर क्लिफ्टनच्या धनुष्यातून जो तीर सुटला तो बरोबर निशाणाच्या मधल्या ठिपक्यावर आपटला.... अगदी मध्यभागी मात्र नाही! मग दुसरा तीर– तिसरा तीर–

पण हे तीर मात्र मधल्या ठिपक्यावर गेले नाहीत. ठिपक्यां-भोवतीच्या पहिल्या वर्तुळावर आदळले ते. आणि तरी सुद्धा लोकांनी क्लिफ्टनला टाळ्या दिल्या. कारण आजच्या शर्यतीत क्लिफ्टनने आपली बाजू पहिल्यानेच सावरली होती.

त्याच्या मागून तांबड्या वुइलची पाळी होती. त्याने सुंदर पिसे लावलेले तीन छानदार बाण निवडून काढले.

रॉबिन हसत म्हणाला,

"जपून.... राजेश्री, जपून! मधल्या ठिपक्यावर तुझ्यासाठी भरपूर जागा रिकामी आहे बघ!"

रॉबिन गेला वुइलला सावध करायला; पण त्याचा परिणाम मात्र उलटा झाला. वुइलने एरवी सहज बाण मारला असता; तो आता उगीचच जास्त काळजी घेऊन मारला आणि त्याने निशाणाचा ठिपका तर सोडाच, पण पहिले वर्तुळ सुद्धा गाठले नाही. तो दुसऱ्या वर्तुळात कुठेतरी जाऊन अडकला.

"च् च्!" रॉबिन हळहळून म्हणाला, "उगीच बोललो मी. काळजी घ्यायची म्हणजे बराच वेळ बोटांत दोरी धरून ठेवायची असं नाही काही.... अशाने सूर्य मावळला तरी बाण सुटायचा नाही एखाद वेळ."

वुइलला ते पटले आणि दुसरे दोन बाण त्याने नीट नेम धरून पण सटासट मारले. ते दोन्ही मधल्या ठिपक्यावर आपटले खरे; पण मार्कांची एकंदर बेरीज क्लिफ्टनचीच जास्त भरली. लोकांनी आनंदाने आरडून ओरडून मैदान डोक्यावर घेतले.

तांबड्या वुइलने खालचा ओठ दातांनी दाबला; पण तो काही बोलला नाही. त्याला स्वतःचाच राग आला होता.

नंतर जॉफ्रि नि ॲलन-अ-डेल ह्यांची जोडी मैदानात उतरली.

ॲलन-अ-डेलला बऱ्याच टाळ्या मिळाल्या. सारंगी वाजवण्याबद्दल तो प्रसिद्ध होता. त्यामुळे सरदारदरकदारांच्या स्त्रिया त्याच्यावर खुष असत. ॲलन-अ-डेलच्या बायकोला एक श्रीमंत बाई म्हणाली, "तुझ्या नवऱ्याची बोटं सारंगीवरून सरसर फिरतात खरी; पण धनुष्याची दोरी त्यांना ताणता येईल का?"

“पाहू या,” ॲलन-अ-डेलची बायको आतुरतेने पुढे वाकत म्हणाली. मनातून तिने देवाचा धावा चालवलाच होता.

आणि देवाने तो धावा ऐकला असावा. जॉफ्रेने मारलेले तिन्ही बाण मधल्या ठिपक्याच्या कडेवर आणि दुसऱ्या वर्तुळाच्या आत आपटले होते आणि तिन्ही बाणांचे पायथे एकत्र येऊन त्यांचा एक त्रिकोणी झुपका तयार झाला होता. ॲलन-अ-डेलने सोडलेले तीर नेमके त्या झुपक्यातून आत घुसले. धावत आलेल्या हरणाने झाडझुडूप बाजूला सारून एखाद्या जाळीत सुरकांडी मारावी तसा तो देखावा होता. ॲलन-अ-डेलचे ते कसब पाहून दरबारी लोकांनीही टाळ्या दिल्या.

ॲलन-अ-डेल जिंकला!

आता अगोदर कोण जाणार? म्हातारीचा मुलगा विली स्ट्यूटली की धाकला जॉन?

तुम्हांला कदाचित माहीत नसेल, पण ह्या दोघा मर्द गड्यांत नेहमीच चुरस असे. तिरंदाजीत रॉबिन हुड अलीकडे इतका अट्टल बनला होता, की टोळीत त्याचा हात धरणारा दुसरा कोणी नाही हे सगळ्यांना पटलेले होते. पण दुसरा नंबर मात्र विली स्ट्यूटलीकडे जावा, की धाकल्या जॉनकडे हे अजून नक्की ठरले नव्हते. कारण दोघेही सारखेच पटाईत होते.

आता आधी कोणी खेळायचे आणि मागे म्हणजे रॉबिनबरोबर राहायचा मान कोणी घ्यायचा अशी चुळबुळ सुरू झाली. भांडण नाही, कारण त्यांच्यात आपसात चढाओढ असली तरी ते दुसऱ्या लोकांसमोर कधीच भांडले नसते.

पण रॉबिनने त्यांची चुळबुळ पाहिली. तो हसला. त्याने आपसात ओली सुकी केली. ती धाकल्या जॉनने जिंकली. विली स्ट्यूटली पहिला गेला. त्याच्या जोडीला होता एलविन. विली आधीच जरा निष्काळजी होता. त्यात आता थोडा नाखुष झालेला. त्यामुळे त्याचे

पहिले बाण एलविनच्या बाणांपासून फार दूर गेले आणि दुसऱ्या वर्तुळावर पडले.

"काय रे हे?" रॉबिन म्हणाला, "लक्षात ठेव. राणीसाहेबांसाठी आपण शर्यत खेळतो आहो. तुझ्या हातांत आमची अब्रू आहे."

विली खजील होऊन पुटपुटला, "माफ करा."

आणि त्याचा तिसरा तीर जो सर्रकन गेला तो निशाणाच्या मध्यभागी!

इतकी सुंदर नेमबाजी अजून कोणीच दाखवलेली नव्हती; त्यामुळे विलीचे लोकांनी अभिनंदन केले. पण बेरीज एलविनचीच जास्त भरली.

राजा खुष होऊन राणीला म्हणाला, "मी म्हटलं नाही? आतापर्यंतच्या तीन जोड्यांपैकी दोन जोड्यांत माझेच गडी पहिले आले. म्हणजे आतापर्यंत माझीच सरशी आहे. राणीसाहेब, संभाळा हं! पुन्हा अशा पैजा मारू नका!"

आणि खरोखरीच राजा आपला सगळा जीव डोळ्यांत आणून बघायला लागला. राजा हॅरी मैदानी खेळांचा फार शौकीन होता आणि त्यांतून तिरंदाजीचे तर त्याला फार कौतुक. शिवाय आज आपली अब्रू जाते की काय अशीही त्याला भीती पडली होती.

आता टेपसची पाळी होती. पण तांबड्या वुइलची चूक त्यानेही केली. फाजील सावध राहून त्याने बाण सोडला, त्यामुळे तो लवकर सुटलाच नाही; आणि सुटला तोपर्यंत टेपसचा हात जरा हललेला होता. दोन वेळा असे झाले. त्यामुळे त्याचे पहिले दोन नेम हुकले. टेपसचे पहिले दोन तीर फक्त पहिल्या वर्तुळात गेले.

तिसरा मात्र मधल्या ठिपक्यात मधोमधं आपटला.... अगदी विली स्ट्यूटलीप्रमाणे! त्यामुळे टेपसलाही भरपूर टाळ्या मिळाल्या. पण त्यानंतर धाकल्या जॉनला जो टाळ्यांचा ढीग मिळाला त्याच्यापुढे हे

काहीच नाही. टेपसच्या प्रत्येक बाणाला उचकटून काढायचे असाच जणू धाकल्या जॉनचा निश्चय दिसला. टेपसच्या पहिल्या दोन बाणांना चाटून धाकल्या जॉनचे बाण गेले आणि आतल्या अंगाला रुतून बसले.

त्याच्या तिसऱ्या बाणाने कमाल केली. निशाणाच्या मध्यभागी टेपसचा तीर मोठ्या ऐटीत रुतून बसला होता. धाकल्या जॉनचा तीर जो सूं सूं करीत आला तो टेपसच्या तीराची हकालपट्टी करून आपण त्याच्या जागी रुतून बसला.

तीर हवेतून येत असताना मात्र कोणाला असे वाटले नव्हते, की तो नेमका मधोमध जाईल. उलट हा नेम चुकणार असेच पुष्कळांना वाटत होते. कारण धाकल्या जॉनने आपली नेहमीची युक्ती केली होती. त्याने बाण जरा तिरका नि उंच सोडला होता. पण तो सोडताना त्याला असा झोका दिला होता, की हवेत उंच उड्डाण करून भरधाव वेगात तो जो उतरला तो नेमका निशाणाच्या मध्यभागी; आणि तसे करताना टेपसच्या बाणाला जोराचा धक्का देऊन त्याने उडवून लावले.

राजाचा आपल्या डोळ्यांवरही विश्वास बसेना. तो म्हणाला, "ह्या माणसाला काही जादूटोणा तर येत नाही?.... एक तर ह्याला सरदार तरी केला पाहिजे किंवा फासावर लटकावला पाहिजे!"

राणी किंचित हसून म्हणाली, "आता आपली बरोबरी झाली बरं का, राजेसाहेब! आता गिलबर्ट नि रॉबिन काय करतात पाहू या."

राजेसाहेब दाढी कुरवाळीत गंभीरपणे बोलले, "खरं आहे, खरं आहे. त्यांच्यावरच आपल्या पैजेचा निकाल लागणार!"

शेवटचा सामना सुरू झाला. गिलबर्टने इतक्या सहज नि सफाईने नेमबाजी केली, की त्याचे तिन्ही बाण नेमके निशाणाच्या ठिपक्यावर मधोमध जाऊन अडकले.

अगदी सूक्ष्मपणे पाहाणारालाच दिसले असते, की त्या तिन्ही बाणांच्या आतल्या बाजूला अजून थोडी जागा शिल्लक आहे.

टाळ्यांचा दणदणाट झाला आणि मैदानावर धूळ उधळली. लोक म्हणाले, "आता ह्यांच्यापुढे रॉबिन हुड काय.... रडणार?"

पण रॉबिन हुड रडला नाहीच मुळी. अगदी हसत हसत तो पुढे झाला. गिलबर्टचे कौशल्य पाहून त्यालाही कौतुक वाटले. धनुष्याला तीर जोडता जोडता तो म्हणाला,

"शाबास गिलबर्ट, खरा तिरंदाज आहेस! शर्यत खेळावी तर तुझ्यासारख्याशी! तरी पण.... तरीं पण.... तू जर आपला पहिला तीर...." हे बोलता बोलताच रॉबिनच्या धनुष्याची ताणलेली दोरी ढिली पडली होती आणि बाण विजेच्या वेगाने हवा कापीत चालला होता.... "इथे मारला असतास.... दुसरा तीर...." लगेच दुसराही निघाला! "इथे मारला असतास.... आणि तिसरा तीर...." म्हणता म्हणता तिसरा तीर निघाला सुद्धा.... "इथे मारला असतास, तर....तर तू सहज जिंकला असतास!"

आणि असे म्हणून रॉबिनने आपले धनुष्य खाली टाकले.

बोलता बोलता त्याने बाण सोडले होते आणि म्हणता म्हणता ते निशाणाच्या मध्यबिंदूवर ठिपक्यावरच्या रिकाम्या जागेत जाऊन पक्के रोवले होते. पहिल्याला लागून दुसरा, दुसऱ्याला लागून तिसरा, असे तिन्ही तीर रुतून बसले होते; आणि तरीही एकाच्या धक्क्याने दुसरा मुळीच हलला नव्हता! त्याचा तो सूरसपाटा पाहून चकित झालेले लोक डोळे फाडफाडून निशाणाकडे बघत होते. त्यांना तीन बाण दिसतच नव्हते. तिन्ही बाण एकाला एक चिकटून बसले होते आणि त्यामुळे पाहाणाराला वाटत होते, की रॉबिनने एकच भक्कम जाडजुड बाण मारला आहे!

अशी तिरंदाजी लंडन शहरात दिसली नव्हती, संबंध इंग्लंडात दिसली नव्हती. ज्यांना आज ती दिसली त्यांना वाटले, आपण धन्य झालो, आपल्या डोळ्यांचे पारणे फिटले.

हर्षाने वेडे होऊन लोक नाचायला लागले आणि "रॉबिन हुड की जय!" म्हणून ओरडायला लागले.

राजेसाहेब आपल्या जागी उभे राहिले. ह्या जंगली पुंडाच्या करामतीने ते थक्क झाले होते; पण अपमानाने त्यांच्या अंगाची आग होत होती. ह्या माणसाला खाऊ की गिळू, असे त्यांना झाले होते. वेड्यासारखे हातवारे करीत ते ओरडले,

"निशाणबाजीचे नियम तरी माहीत आहेत कुणाला? मधल्या ठिपक्यावर तिन्ही बाण मारले, की जीत झाली असा शर्यतीचा कायदा आहे. रॉबिनने जसे ठिपक्यात बाण मारले तसेच गिलबर्टनेही मारले आहेत. तेव्हा 'रॉबिन की जय' म्हणून बोंबलण्याचं कारण नाही!"

रॉबिनने शांतपणे वाकून एक मुजरा ठोकला.

"जशी महाराजांची मर्जी!" तो म्हणाला, "मग दोघांत वरचढ कोण हे आपण पुन्हा ठरवू या."

असे म्हणून त्याने जंगलचा कायदा अमलात आणला. वेताच्या काठीसारखी हिरव्यागार कडब्याची एक लांबसडक छडी त्याने आणली आणि निशाणाच्या ठिकाणी जमिनीत रोवून उभी केली.

मग तो गिलबर्टला म्हणाला, "चला साहेब, आपल्या त्याच रेघेवर उभं राहायचं नि ह्या छडीला बाण मारायचा. आपण जिंकलात तर रॉबिन हुडचा हा तिरकमठा आपल्याला सप्रेम भेट. पुन्हा म्हणून हा पुंड हातांत धनुष्यबाण घेणार नाही."

गिलबर्ट पुटपुटला, "मला तर तुझी छडी इथून नीट दिसत सुद्धा नाही. पण महाराजांची अब्रू सांभाळली पाहिजे."

असे म्हणून त्याने धनुष्य ताणले, डावा डोळा मिटला आणि नेम धरून बाण सोडला. आणि दूर कुठे तरी जाऊन बाण पडला तेव्हा छडी आपली होती तशीच ताठ उभी होती. तिला गिलबर्टच्या बाणाचे वारे देखील लागले नव्हते.

मग रॉबिनने आपल्या भात्यातून एक सुटसुटीत बारीक तीर काढला, धनुष्याला जोडला, धनुष्य ताणले आणि डावा डोळा क्षणभरच मिटल्यासारखे केले.

तिकडे तीर सुटलाही होता आणि डोळ्याचे पाते लवते न लवते तो आपल्या निशाणावर पोचला होता. छडी बरोबर मध्यावर पिंजून त्याने तिची दोन शकले केली होती. गिलबर्टला वाटले, आपल्या हुशारीचीच शकले केली ह्या रॉबिन हुडने!

आता वरचढ कोण ह्याबद्दल शंका राहिली नव्हती. दरबारी तिरंदाज धुळीला मिळाले होते. राजेसाहेब पैज हरले होते. राणीसाहेब पैज जिंकल्या होत्या.

राजेसाहेब रागारागाने उठले. "द्या बक्षिसे ज्यांची त्यांना." असे त्यांनी राणीला फर्माविले आणि आपल्या झग्याचे फलकारे मारीत ते निघून गेले.

राणीसाहेबांनी शरवुडकरांना आपल्यासमोर बोलावले. ते आले आणि त्यांनी अदबीने गुडघे टेकले.

राणी म्हणाली, "शाबास! मला तुमचा अभिमान वाटतो. माझी बाजू तुम्ही राखलीत!.... ही घ्या तुमची बक्षिसं तुम्हांला..."

असे म्हणून राणीने बक्षिसे वाटली. रॉबिनच्या हातात तिने चाळीस सोन्याची नाणी असलेली थैली दिली. धाकट्या जॉनलाही थैलीच मिळाली. पण तीत चांदीची नाणी होती.

ॲलन-अ-डेलला चांदीचे बिगूल मिळाले आणि त्याने अगदी उड्या मारीत ते घेतले. कारण सारंगीइतकेच तऱ्हेतऱ्हेचे सूर बिगुलावर काढण्यात ॲलन पटाईत होता!

ह्याशिवाय लठ्ठेश्वरभटजीचे शंभर पौंडही राणीने रॉबिनच्या टोळीलाच देऊन टाकले आणि शिवाय आपली खास भेट म्हणून नवी तलवार विकत घ्यायला प्रत्येकाला पैसे दिले.

शरवुडच्या वनवीरांना पाहायला तुफान गर्दी लोटली. रॉबिन म्हणाला, "हे लोक आम्हांला पिंजऱ्यातले वाघ-सिंह समजलात की काय?"

त्यावर गिलबर्ट त्याची पाठ थोपटून म्हणाला, "त्यात नवल कसलं वाटतं तुला? तुम्ही शरवुडवाल्यांनी कमाल केली! असली निशाणबाजी पूर्वी आम्ही पाहिलेली नाही आणि पुढे कधी पाहाणार नाही!" कारण गिलबर्ट शर्यतीत हरला असला तरी तो हाडाचा खेळाडू होता.



# ९

राजाने आपला शब्द पाळला. रॉबिन हुडच्या टोळीने सुखरूप लंडन सोडले आणि शरवुड गाठले. चाळीस दिवसांपर्यंत त्यांना कोणीही त्रास दिला नाही.

एकेचाळिसावा दिवस उजाडला मात्र, सरकारी अधिकाऱ्यांची हालचाल सुरू झाली. रॉबिनला पकडण्यासाठी मोठी मोहीम काढायचे त्यांनी ठरवले. लंडनच्या शर्यतींना हजर राहून रॉबिनने जो चमत्कार केला होता, त्यामुळे त्यांची नाचक्की झाली होती. ती धुऊन काढण्यासाठी झटपट काही तरी करणे भाग होते.

नॉटिंगहॅमच्या कोतवालाची तर जो तो टर उडवीत होत. "तुझ्या प्रांतातला माणूस आणि तुला सापडत नाही.... म्हणजे आहे काय!"

असे लोक त्याच्या तोंडावर म्हणायला लागले. शेवटी एक दिवस तो चिडला आणि पुष्कळसे शिपाई बरोबर घेऊन निघाला. पंधरा दिवस त्याने जंगल पालथे घातले. पण रॉबिनच्या एकशे चाळीस लोकांपैकी एकाचेही नख त्याला दिसले नाही.... होय, रॉबिनच्या टोळीत आता एकशे चाळीस लोक होते!

एक मोहीम फसली. दुसरी काढली तीही फसली. असे कितीदा तरी झाले. कोतवाल निराश होऊन बोटे मोडू लागला.

कोतवालाची मुलगी मोठी सोसमावशी होती हे तुम्हांला माहीतच आहे. नॉटिंगहॅमच्या जत्रेत अंगावर ठळक ठळक दागिने घालून ती आली होती. पण रॉबिनने तिच्याकडे पाहिले सुद्धा नाही आणि बक्षिसाचा बाण मेरियनला दिला, तेव्हापासून तिचा रॉबिनवर घुस्सा होता. ती रोज त्याच्या नावाने दात ओठ खायची.

तिच्या पुढे पुढे करणारे लोक होतेच. त्यांना तिने सांगितले की, "रॉबिनला तुम्ही पकडून आणाल तर सरकारी बक्षीस तुम्हांला मिळेलच, पण मी स्वतः तुम्हांला एखादा दागिना देईन!" आणि तिचे दागिने किती भारी आहेत ते सर्वांना माहीत होते. त्यामुळे त्यांतल्या काहीजणांनी रॉबिनची शिकार करण्याचा प्रयत्न केला.

मिडल नावाचा तांबट होता. दिवसभर भांड्यांवर ठकठक करणे हे त्याचे काम. पण त्या 'ठकठक'ने होणार नाही इतका त्रास तो आपल्या वटवटीने लोकांना देई. 'यंव करीन नि त्यंव करीन' अशा त्याच्या गप्पा दिवसभर चालत. एक दिवस रॉबिनबद्दल त्याने बरेच ऐकले आणि तो निघाला. "रॉबिन....रॉबिन! कुठच्या झाडाचा पाला तो! आत्ता लंबे करतो."

स्वारीने खांद्याला आपली पिशवी अडकवली होती आणि हातात फक्त दंडुका होता. पिशवीत भांडी ठोकायचा हातोडा बितोडा असे सामान होते.

शरवुडच्या रानाबाहेर एका खाणावळीत त्याची नि रॉबिनची गाठ पडली आणि नेहमीप्रमाणे मारामारी झाली. रॉबिनने राणीच्या पैशातून विकत घेतलेली तलवार उपसली होती. तलवारीचा नि दंडुक्याचा खणखणाट झाला. बराच वेळ चकमक झडली. दोघांच्याही अंगांतून घामाच्या नद्या गेल्या आणि.... होय, रक्ताचे पण थेंब उडाले!

रॉबिनने पाहिले, एवढी धारेची तलवार पण तिला ह्याचा दंडुका दाद देत नाही. तेव्हा बापड्याने हार खाल्ली.

मिडल घाम पुशीत ओरडला, "जिते रहो! मला तू आवडलास. छान लढतोस! तुझ्या टोळीच्या तलवारींना धारबीर लावायचं काम असेल ना? मी करीन ते. ठेवून घेतोस मला?"

आणि अशा रीतीने रॉबिनला एखाद्या भांड्यासारखे यथास्थित ठोकून झाल्यानंतर मिडल तांबट त्याचा सेवक बनला. मारायला म्हणून आला होता, तो मरेपर्यंत रॉबिनजवळ राहिला.

आर्थर मोच्याचे तसेच झाले.

आर्थर मोची म्हणजे मस्त आडदांड प्राणी. चालायला लागला, की हत्ती झुलतो आहे असे वाटे. रंगणात कुस्तीला उतरला, की पट्टीचे पैलवान पळ काढीत. त्याने दंड थोपटले तरी पोरे घाबरत. तीन वर्षांपर्यंत पृथ्वीच्या पाठीवरचे सगळे पैलवान त्याने पटापट चीत केले. मग लिंकनचा एरिक त्याला जोडीदार भेटला. एरिकने त्याच्या बरगडीचे एक हाड मोडल्यापासून आर्थर गुपचूप ढोरांची कातडी कमावीत बसला होता. पण आता रॉबिनच्या गोष्टी ऐकून तो चवताळला आणि एक लांबलचक बांबू खांद्यावर टाकून त्याची पाठ शेकायला निघाला.

रॉबिनची पाठ त्याने चांगलीच शेकली. इतकी की रॉबिन पुढे म्हणाला, "तू खरा मोची आहेस बुवा! अंगाची कातडी झक्क सोलतोस!"

रॉबिनच्याही हातात त्या वेळी बांबूच होता आणि त्यानेही आर्थरचे टाळके सडकले होते. पण रक्ताने डोके न्हाऊन निघाले तरी आर्थर आपला लढतच होता.

काठीवर काठी आपटे, काडकाड आवाज होई, पाठीत मार बसे, दब्ब होई, डोक्यावर वार येई, रक्ताची धार लागे. 'अयाई–उयाई–हे घे–कट्ट!' असे तासभर चालले होते. शेवटी आर्थर मोच्याचा विजय झाला

आणि रॉबिनचा हात दाबीत तो म्हणाला, "लाख मोलाचा गडी आहेस तू. ह्यापुढे जोडे शिवीन तर तुझे नि तुझ्या टोळीचे!"

रॉबिनला पकडायला म्हणून आपण आलो हे मोचीदादा केव्हाच विसरला होता.

असे झाल्यावर कोतवालाचे काय चालणार? आणि त्याची नखरेल मुलगी तरी काय करणार? बसली दोघे हात चोळीत.

खरे पाहिले तर कोतवालाची फजिती पाहून हॅरी राजाने त्याला काढूनच टाकले असते. पण तेवढ्यात राजा स्वतःच आजारी पडला आणि मेला. त्याच्यामागून रिचर्ड गादीवर आला. रिचर्ड अतिशय शूर, निधड्या छातीचा म्हणून त्याला 'सिंह-हृदयी' असेच नाव पडले होते. पण रिचर्ड शूर होता म्हणूनच त्याने आल्याबरोबर लढाया सुरू केल्या. शत्रूचा समाचार घ्यायला त्याला दूर देशात जावे लागले आणि इकडे त्याचा भाऊ जॉन ह्याने झोटिंगशाही सुरू केली.

जॉनकडे तात्पुरता कारभार आला होता. पण तेवढ्यात त्याने आपला इंगा दाखवला. गरीबगुरीब जनतेला त्याने नाडले. सापडेल ती दौलत त्याने बळकावली. त्यातच हंटिंग्डनची इनाम जमीनही त्याने घशात घातली. हंटिंग्डनचा खरा मालक रॉबिन; पण पुढे त्याच्या शत्रूने म्हणजे मेरियनच्या बापाने ती जमीन लाटली होती हे तुम्ही वाचलेच आहे. मेरियनचे वडील नुकतेच वारले होते आणि मेरियन एकटी पडलेली पाहून जॉनने तिची दौलत लुबाडली होती.

एवढेच करून तो दुष्ट थांबला नाही. 'माझ्याशी लग्न कर,' म्हणून तो मेरियनजवळ हट्ट धरून बसला. मेरियन इतकी चिडली, की एक दिवस पुन्हा आपला पुरुषी वेष तिने चढविला आणि गुपचूप लंडन शहर सोडले.

ती शरवुडच्या रानात रॉबिनकडे आली आणि तिने आपली सगळी हकीकत त्याला सांगितली.

रॉबिन म्हणाला, "मी असल्यावर तुला भिण्याचं कारण नाही. तू आता इथेच राहा."

तो इतके बोलतो आहे इतक्यात दुरून काही मंडळी येताना दिसली.

त्यातले तिघे तर रॉबिनचे टोळकरीच होते. चौथ्याला मात्र रॉबिनने ओळखले नाही. पण मेरियनने ओळखले. ती लगबगीने म्हणाली, "अगबाई, हे तर रिचर्ड! ह्यांनी मला ओळखलं बिळखलं तर? मी तर पोशाखही बदललेला नाही."

"काही हरकत नाही," रॉबिन हसत म्हणाला, "तू सध्या ह्याच पोशाखात राहा नि सेवक म्हणून काम कर.... पण हे सरदारसाहेब कोण?"

मग रॉबिनला आठवले, लंडनमध्ये त्या शर्यतींच्या वेळी आपण ह्याला पाहिलेले आहे. राणीने मुद्दाम त्याला पुढे बोलावले होते आणि हे सरदारसाहेब म्हणाले होते, की शरवुडच्या जंगलात असे असे शूर लोक आहेत. तिरंदाजीत त्यांचा हात कोणी धरणार नाही.

सरदारांना आज आपल्या शूर दोस्तांनी खरोखरीच हात दाखवलेला दिसतो. पण त्यांचा चेहेरा इतका पडलेला का? आणि पोशाखही फाटलेला नि मळकट का?

त्याचेही कारण त्याला लवकरच कळले. सरदारसाहेबांसाठी रॉबिनने पहिल्याने थाटामाटाची मेजवानी दिली आणि सर्वांनी मोठ्या रंगात येऊन तिच्यावर आडवा हात मारला. फार दिवसांनी आपली मालकीण आलेली म्हणून त्यांच्या गप्पाही रंगल्या होत्या.

पण पाहुणे सरदार मात्र गप्पच होते. त्यांच्या घशाखाली घासच उतरत नव्हता. यजमानाचे आभार मानलेच पाहिजेत म्हणून सरदारसाहेब शेवटी एवढेच म्हणाले, "कितीक दिवसांत असा खुराक मिळालेला नाही मला. रॉबिनसाहेब, केव्हा तरी आमच्या गढीवर या. मीही तुम्हांला भोजन द्यायचा प्रयत्न करीन."

"तेवढ्यावर भागायचं नाही साहेब!" रॉबिनने उघड उघड सांगितले. "पाहुण्यांची थैली खोलून पाहायची असा आमचा रिवाज आहे."

सर रिचर्डनी तोंड वाकडे केले आणि खिशातली दहा चांदीची नाणी काढून रॉबिनपुढे ठेविली.

रॉबिनने धाकल्या जॉनकडे पाहून डोळा मिचकावला. लगेच जॉनने पाहुण्याचे खिसे तपासले आणि माहिती दिली, "कुछ नही!"

रॉबिनने डोळे बारीक करून पाहुण्याकडे पाहिले. तो म्हणाला, "सरदारसाहेब, आपण संकटात दिसता. हरकत नसेल तर आम्हांला सांगा सगळं. आम्ही कुणाजवळ बोलणार नाही!"

लगेच सर रिचर्डनी आपली हकीकत सांगितली. ते जड आवाजात म्हणाले, "तुम्हांला वाटत असेल हा मोठा सरदार, ह्याचे कपडे असे फाटके मळके का? तोंड असं रडवं का? ....पण बाबांनो, काय करू? नशीब हात धुऊन पाठीला लागलंय्! रिचर्ड महाराजांबरोबर मी युद्धावर गेलो होतो. तिकडे जखमी होऊन नुकताच परत आलो. माझा वीस एक वर्षांचा मुलगा आहे. त्याला सगळं सरदारी शिक्षण उत्तम मिळालं आहे. घोड्यावर बसतो, निशाणबाजी करतो, तलवारीचे पट्टे खेळतो ....पण असंच एका सरदाराशी द्वंद्व खेळताना झालं काय, अगदी चुकून ह्याचा वार सरदाराच्या काळजाला लागला नि सरदार मेला. राजपुत्र जॉन माझ्या वाईटावर होताच. त्याला ही चांगली सबब मिळाली. त्याने माझ्या मुलाला फासावर द्यायची कारवाई सुरू केली. तेव्हा काही तरी करून सरकारी अधिकाऱ्यांना पैसे चारावेत म्हणून मी माझ्या जमिनी गहाण ठेवल्या नि कर्ज काढलं."

"कुणाकडून?"

"हरफर्डच्या बिशपकडून."

"लठ्ठेश्वरभटजी ना? वाटलंच!"

"चारशे पौंडांचं कर्ज आहे मला. कसं फेडणार मी ते?" सरदारसाहेब खिन्न सुरात म्हणाले, "आणि नाही तर माझ्या जमिनी जप्त होणार!"

"कोणी मित्र जामीन राहात नाही का?"

"कोणी नाही! रिचर्डमहाराज असते तर ते शक्य होतं. आता मला कोण विचारतं?"

क्षणभर रॉबिन हुड विचार करीत होता. मग धाकला जॉन, मच नि तांबडा वुइल ह्यांच्याशी त्याने वाटाघाट केली. त्याचे काही तरी ठरले. नंतर तांबडा वुइल गुहेत गेला आणि त्याने नाण्यांनी भरलेली थैली आणून सर रिचर्डपुढे ठेवली.

"सरदारसाहेब, चारशे पौंड आहेत. मोजून घ्या," रॉबिन म्हणाला, "आणि आमचं कर्ज केव्हाही परत करा. घाई नाही!"



इतक्यात चक्कीवाल्याचा मुलगा मच ह्याने एक मोठे गाठोडे फरफटत आणले.

कपाळाचा घाम पुशीत तो म्हणाला, "रॉबिन, तुला काय वाटतं? ....सरदारसाहेबांनी त्यांच्या दर्जाला साजेसा पोशाख करायला हवा, नाही का?"

"खरं आहे," रॉबिन म्हणाला, "पट्टी घे आणि चांगल्या भारीपैकी मखमली कापडातून वीस वार कापड मोज आणि आर्थर मोची, तू सरदारसाहेबांसाठी घोडा काढ चांगला दमदार!"

रिचर्डच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहू लागले. ते म्हणाले, "हा तुमचा चांगुलपणा मी कधी विसरणार नाही. रॉबिन, आता आपण दोस्त झालो. केव्हा ना केव्हा तुझ्या पाहुणचाराची फेड करीन!"





# १०

सर रिचर्ड परत गेल्यानंतर थोडेच दिवस लोटले होते. आर्थर मोच्याने बातमी आणली, की लठ्ठेश्वरभटजी भल्या पहाटे घोड्यावर बसून शरवुडजवळून जायचे आहेत. लगेच रॉबिनने एक डाव रचला.

शरवुडच्या शिवेवरून ती वाट जात होती. रॉबिनने आणि त्याच्या सोबत्यांनी धनगरांचे कपडे घातले आणि रस्त्याच्या कडेला एक चूल पेटवली. मग नुकतेच मारलेले एक हरीण त्यांनी चुलीवर भाजायला सुरुवात केली.

झुंजूमुंजू झाले. दिसायला लागले. थोड्याच वेळात लठ्ठेश्वरभटजींची स्वारी आली. भटजी एका पांढऱ्या तट्टावर बसले होते आणि त्यांच्या भारामुळे तट्टाचे कंबरडे वाकले होते. भटजींबरोबर हत्यारे घेतलेले दहा स्वार होते.

आपल्या देखत खुशाल हे भिकारडे धनगर शिकार भाजीत आहेत हे पाहून भटजींचा संताप अनावर झाला. तट्टाचा लगाम खेचून ते

ओरडले, "कोण रे तुम्ही? राजेसाहेबांची हरणं खायला लाज नाही वाटत तुम्हांला?"

रॉबिनने कपाळावर आलेले केस उपटले आणि म्हटले, "तुम्हांला काय करायचंय वो पाहुणे? तुम्ही सोता कोण तेवढं सांगता जरा?"

लठ्ठेश्वरभटजींचा एक स्वार पुढे झाला आणि दरडावून म्हणाला, "हरफोर्डच्या बिशपसाहेबांना ओळखत नाहीस?"

"हरफोर्डचे बिशप? ....म्हणजे लठ्ठेश्वरभटजीच न्हवं का आपले? ....गरिबांना छळणारे नि श्रीमंतांपुढे गोंडा घोळणारे?"

"चूप बस, हरामखोरा! पाहाता काय? ....पकडा रे त्याला!"

पण रॉबिनला पकडण्यासाठी ते दहाजण धावून येताहेत तोच तो चपळाईने उठला होता आणि त्याने कंबरेचे शिंग काढून फुंकले होते. लगेच दहाच्या दसपट वीर धनुष्यबाण घेऊन प्रगट झाले आणि त्यांनी लठ्ठेश्वरभटजींना गराडा दिला.

"घाबरू नका, भटजी," रॉबिनने हसत सांगितले, "ज्या हरणाला आपण एवढी हरकत घेतलीत तेच हरिण तुम्हांला आता खायला घालणार आहो आणि सैंपाक करणार कोण, माहीत आहे? चक्कीवाल्याचा मुलगा मच!"

भटजींनी ओठांवरून जीभ फिरवली. मचच्या फर्मास सैंपाकाची त्यांना आठवण होती. त्याचे नुसते नाव कोणी काढले तरी नेहमीच त्यांच्या तोंडाला पाणी सुटायचे.

आता एवीतेवी आपण रॉबिनचे कैदी झालोच आहो. तेव्हा आली वेळ साजरी का करू नये? असा त्यांनी शहाणपणाचा विचार केला आणि काही न बोलता गाल फुगवून ते तट्टावर बसून रॉबिनबरोबर निघाले.

पण त्यांचे तट्टू बिचारे ठेचाळत ठेचाळत चालले होते. कारण भटजीचा खास सन्मान करावा म्हणून रॉबिनने अर्धे भाजलेले हरिण

त्यांच्या तट्टावर बांधले होते आणि त्यामुळे भटजींची स्वारी धक्के खात चालली होती.

पण मुक्कामावर पोचल्यावर तो मेजवानीचा थाट पाहून भटजी अगदी गार पडले. वाटचालीच्या श्रमाने त्यांच्या पोटात कावळे ओरडायला लागले होते. त्यामुळे रॉबिनने त्यांना मुद्दाम अर्धेकच्चे मांस वाढले तरी भटजींनी ते अगदी मिटक्या मारीत खाल्ले. नेहमी ते चांदीच्या पेल्यातून उंची मद्य पीत. आज पोखरलेल्या पोकळ शिंगात दिलेली दारू ते घटाघट प्याले.

संध्याकाळ होऊन झाडांच्या लांब लांब सावल्या पडू लागल्या तशी स्वारी अगदी खुषीत आली आणि रॉबिनच्या पाठीवर थाप मारून म्हणते, "तुझं माझं वाकडं का आहे, रॉबिन? पण कर्तव्य म्हणून आम्हांला हे करावं लागतं. आता...."

पण गप्पा मारता मारता अंधार पडला, रात्र झाली आणि लट्ठेश्वरभटजी एकाएकी चमकून भानावर आले. त्यांना एकाएकी आठवण झाली, की रॉबिन हुड मिष्टास जेवण घालतो खरा, पण त्याची किंमतही तो भरपूर वसूल करून घेतो. खुद्द कोतवालाचा अनुभव आपल्या डोळ्यांपुढे आहेच की!

तेव्हा लगबगीने उठत त्यांनी म्हटले, "रॉबिन, आता जातो मी. तुझ्या ह्या मेजवानीची फेड कशी करावी हेच मला समजत नाही."

"त्याची तुम्हांला नको काळजी." रॉबिन म्हणाला, "ते आमचं आम्ही पाहून घेऊ."

आणि तिकडे धाकल्या जॉनने केव्हाच भटजीबुवांच्या लांब झग्याचे खिसे उलटे पालटे केले होते. त्यातून चारशे चकचकीत सोन्याची नाणी निघाली. काही दिवसांपूर्वी रॉबिनने सर रिचर्डना दिलेली तीच ती चारशे नाणी होती. ती परत आपल्याकडे अनायासे आलेली पाहून रॉबिनच्या टोळकऱ्यांनी आनंदाने गलका चालवला.

रॉबिन म्हणाला, "हे ठीक झालं. आपण धर्मगुरू पडलात, संकटात असलेल्यांना मदत करणं हे धर्माचं काम आहे आणि माझा एक दोस्त खरोखरीच संकटात आहे. एका धर्मगुरूचंच त्याला देणं आहे काही तरी!"

बिचारा 'धर्मगुरू' गोरामोरा झाला. कुठचा मुहूर्त पाहून आपण आज ह्या मोहिमेवर निघालो असे त्याला झाले.

पण रॉबिनने एवढ्यावरच त्यांची सुटका केली नाही. भोजनानंतर नाचगाणे हवेच असे म्हणून त्याने नि त्याच्या सोबत्यांनी फेर धरला. ॲलन-अ-डेलने सारंगी वाजवली आणि गाण्याच्या तालसुरावर नाचत त्या लहरी लुटारूंनी शरवुडच्या अरण्याचे कोनेकोपरे दुमदुमून सोडले. त्या नाचात लठ्ठेश्वरभटजींना सक्तीने भाग घ्यावा लागला. त्यामुळे नुकतेच खाल्लेले जेवण त्यांना पचले असेल; पण त्यांची हाडे मात्र खिळखिळी झाली. शेवटी त्यांनी अगदी थकून जाऊन जमिनीवर लोळण घेतली.

मग धाकल्या जॉननी त्यांचे मुटकूळे उचलून एका खेचरावर उलटे बसवले आणि त्यांची नि त्यांच्या दहा स्वारांची धिंड काढली.

त्यांना नॉटिंगहॅमच्या रस्त्यावर सोडून देऊन ही टोळी परत आली, तोपर्यंत मध्यरात्र झाली होती. आजच्या प्रसंगाने खुष होऊन सर्वांनी मग शेकोटीजवळ बसून गप्पा मारल्या.

तेव्हापासून रॉबिन जरा निष्काळजी बनला. नेहमीच शत्रूवर जय मिळत गेला, की मनुष्य गाफील राहातो. रॉबिनचे तसेच झाले.

मध्ये एकच दिवस गेल्यावर पुन्हा रॉबिन जंगलाच्या शिवेवर त्याच रस्त्याकडे भटकत गेला आणि योगायोग असा, की लठ्ठेश्वरभटजींची नि त्याची पुन्हा गाठ पडली.

भटजींच्या बरोबर स्वार होतेच. आपल्या अपमानाचे उट्टे काढण्यासाठीच ते मुद्दाम आज आलेले होते. रॉबिन एकटा दिसताच त्यांनी आनंदाची एक आरोळी ठोकली आणि घोडा रॉबिनच्या अंगावर घातला.

आणि एकदा अरण्य गाठल्यावर तर ती हरणासारख्या उड्याच मारीत गेली. पण ह्या मूर्ख स्वारांचे तिकडे लक्ष होते कुठे?

त्यांनी झोपडीच्या दारावर धक्के मारायला सुरुवात केली, पण ते भक्कम दार त्यांना दाद देईना. भटजींनी आग लावण्याच्या पुष्कळ गप्पा मारल्या, पण तेवढे धाडस त्या भित्र्याला करवले नाही.

"मोडा.... फोडा..... तोडा ते दार!" भटजी घामाघूम होऊन ओरडत होते.

अखेरीस दार एकदाचे कडाडून पडले आणि रस्ता मोकळा झाला.

पण आत एकदम पाऊल टाकण्याचा धीर कोणालाही झाला नाही. केव्हा नि कुठून बाण येईल नि छातीत घुसेल ह्याचा नेम नाही असे त्यांना वाटत होते.

शेवटी एकाने हिय्या केला आणि आत पाऊल टाकले.

"तो पाहा कोपऱ्यात बसला आहे! पण तो असा गप्प का?..."

कोपऱ्यात बराच अंधार होता; तरी तिथे खरोखरीच रॉबिनचा लाल किनारीचा हिरवा झगा झगझग करताना दिसला. पण रॉबिन इतका स्वस्थ आहे तेव्हा ह्यात त्याचा काही तरी डाव असला पाहिजे असे वाटून कोणीही त्याच्यावर एकदम हात उगारला नाही.

एकही शब्द न करता हळूहळू दबकत दबकत त्यांनी तीन बाजूंनी कोपऱ्यावर चाल केली आणि मग एकदम रॉबिनवर झडप घालणार तोच.... मागून गर्जना झाली, "मेल्यांनो...."

ते सर्व मागे वळले, तो मघाची म्हातारी दार अडवून उभी असलेली त्यांना दिसली. म्हातारीला जेव्हा दिसले, की ह्या उपटसुंभांनी आपल्या दाराचा विध्वंस केला आहे, तेव्हा ती भयंकर चिडली. हातातली चाती तिने फेकून दिली आणि तोंडाचा पट्टा सुरू केला.

"पाजी.... हरामखोर.... बदमाष! तुमचं वाटोळं होईल, कोटी कोटी वर्षं तुम्ही नरकात पडाल...."

"ए टवळे, पुरे कर तुझे ते शाप!" भटजीबुवांचा राग पुन्हा उसळला, "थांब, तुलाच नेतो धरून चौकीवर...."

"अस्सं काय? बघाच तर मग चमत्कार!" म्हातारी एकाएकी ताठ झाली आणि बाहेर पाहात तिने तीन वेळा जोराने टाळी वाजवली.

लगेच आसपासच्या भागातून पन्नास-साठ तिरंदाज धावत दौडत आले आणि त्यांनी झोपडीच्या दारापाशी गर्दी केली.

लठ्ठेश्वरभटजी गांगरून गेले. हा काय प्रकार आहे त्यांना कळेना. पण अजून त्यांना ही म्हातारी म्हणजेच रॉबिन हुड आहे हे कळले नव्हते. त्यांनी उसना धीर आणून दरडावले,

"खबरदार आमच्यावर हल्ला कराल तर! लक्षात ठेवा, तुमचा मालक इथे ह्या झोपडीत आहे आणि आमच्या अगदी तावडीत सापडला आहे. तुम्ही जरा गडबड केलीत की हे भाले त्याच्या पाठीत घुसलेच म्हणून समजा!"

पण भटजीची ही धमकी पुरी होते न होते तो कोपऱ्यातला हिरवा झगा हालला आणि तो खाली फेकून खरी म्हातारी थरथर कापत उभी राहिली.

"मेल्यांनो...." तिचाही भडिमार सुरू झाला.

आपण ज्याला रॉबिन समजत होतो तो म्हातारीच ठरला हे पाहून भटजी नि त्यांचे स्वार सर्दच झाले. त्यांच्यावर आता दोन्हीकडून शिव्यांची लाखोली चालली होती आणि पुरती रेवडी उडाल्यामुळे त्यांना मेल्याहून मेल्यासारखे झाले होते.

खो खो हसून रॉबिन म्हणाला, "मिळाला रॉबिन? ....म्हातारीला चौकीवर नेत होतास काय? चल, तुलाच आता चौकीवर नेतो.... आमच्या चौकीवर!"

आणि मग तिरंदाजांच्या खास पहाऱ्यात लठ्ठेश्वभटजींनी पुन्हा एकदा शरवुडच्या अरण्यात प्रवेश केला. तेथे त्यांची रॉबिन हुडपुढे 'कायदेशीर

चौकशी' झाली आणि रॉबिनला पकडण्यासाठी खास बक्षीस द्यायला म्हणून त्यांनी जे पैसे आणले होते ते कोर्टाने जप्त केले!

"आणखी एक खटला आहे," रॉबिन म्हणाला, "सकाळचा कोण रे तो ज्यू माणूस? ....आणा त्याला पुढे."

एक अगदी म्हातारा वाकलेला मनुष्य कण्हत कुंथत पुढे आला आणि त्याने सलाम केला.

"तुझेच ना शंभर पौंड भटजींनी जप्त केले?"

"जी! अगदी उगाच बघा. मला कराची माफी मिळालेली होती."

"मग तुझे ते पैसे तुला परत मिळवून दिले तर तू आम्हांला काय देशील?"

"त्यातले निम्मे पैसे खुषीने देईन."

"ठीक.... तर मग बिशपसाहेब, तुम्ही एवढंच करा, ह्या गरीब म्हाताऱ्याला आपण शंभर पौंड देऊ म्हणून लिहून द्या आणि त्याशिवाय तितकेच म्हणजे आणखी शंभर पौंड आम्हांला द्या!"

आणि भटजींनी तसे केले तेव्हाच त्यांची जिवानिशी सुटका झाली!



# ११

लट्ठेश्वभटजींना आता रॉबिनचा इतका धाक बसला, की पुन्हा ते शरवुडच्या वाटेला गेले नाहीत. कोतवालालाही चांगला धडा मिळाला होता. तेवढ्यावरून गप्प बसायचे ते सोडून त्याने एक मूर्खपणाची गोष्ट केली. तो लंडनला गेला. राजपुत्र जॉनला त्याने सांगितले, "रॉबिन फार शिरजोर झाला आहे. त्याला पकडण्यासाठी बरंच मोठं सैन्य हवं आहे, ते मला द्या."

पण जॉनने त्याची रेवडीच उडवली. "तुला आणखी दसपट सैन्य दिलं तरी तुझ्या हातून रॉबिन कसचा पकडला जातो? तू एवढा मोठा कोतवाल आहेस, तुला कायद्याचे अधिकार आहेत. तुझ्यापाशी शिपाई आहेत. छाती असेल तर पकड त्या पुंडाला. माझ्याकडे येऊ नकोस तोंड वेंगाडायला!" असे म्हणून त्याने त्याला वाटेला लावले.

कोतवाल आंबट तोंड करून परत आला तेव्हा त्याच्या मुलीने त्याला सुचवले, "असं केलं तर?"

“क्यशं?” कोतवालाने चिडून विचारले.

“नीट ऐकून तर घ्या बाबा,” मुलगी म्हणाली, “रॉबिनला जाळ्यात पकडायचा एकच मार्ग आहे. मागे जशी निशाणाबाजीची शर्यत ठेवली होती तशीच पुन्हा ठेवू या.”

कोतवालाला वाटले, अगदीच वाईट नाही हा उपाय. रॉबिनला निशाणबाजीचे वेड इतके आहे की शर्यती म्हटल्याबरोबर तो येईलही धावत कदाचित !

लगेच हिवाळ्यातला एक दिवस नक्की ठरवून कोतवालाने शर्यतीची दवंडी पिटली. वाटेल त्याला शर्यतीत भाग घ्यायला मोकळीक होती. पहिल्या नंबराला एक सोन्याचा बाण, दुसऱ्याला चांदीचा बाण बक्षीस मिळणार होता. शिवाय आणखी देखील काही बक्षिसे होती.

रॉबिन हुडच्या कानांवर ही बातमी गेली तेव्हा त्याने आपले रंगेल गडी एकत्र जमवले आणि तो म्हणाला, “छे बुवा! आपण गेलंच पाहिजे ह्या शर्यतीला!”

“चांगलं आहे!” आर्थर मोची म्हणाला, “म्हणजे आयतेच जाळ्यात सापडू!”

पण रॉबिन आता स्वस्थ बसणार नव्हता. तिरंदाजी म्हटली, की त्याचे हात शिवशिवू लागत. काय वाटेल ते झाले तरी ही बक्षिसे उपटायची आणि जगात आपल्यासारखे तिरंदाज नाहीत हे दाखवून द्यायचे, असा त्याचा निश्चय झाला.

शेवटी वेश पालटून जायचे असे ठरले. दिवसभर बसून मोठ्या मेहनतीने त्यांनी आपले चेहेरे रंगवले. मेरियन ह्या कामात हुषार होती. तिने, ॲलनच्या बायकोने आणि टक पुजाऱ्याने सर्वांची सोंगे इतक्या कौशल्याने सजवली, की एकमेक एकमेकाला ओळखू येईना! मग नेहमीचे हिरवे झगे न घालता कोणी पिवळा, कोणी काळा, कोणी सफेत, कोणी पिंगट असे रंगीबेरंगी तऱ्हेतऱ्हेचे पोषाख चढवले.

आणि मग, हे सबंध टोळकेच्या टोळके नॉटिंगहॅमकडे निघाले.

ह्या खेपेला कोतवाल फार सावध होता. शहराच्या प्रत्येक वेशीपाशी त्याने चलाख पहारेकरी बसवले होते. जरा कोणाचा संशय आला, की ते त्याची वर्दी देत. पण त्या दिवशी शर्यत पाहायला नि खेळायला म्हणून आसपासच्या गावांतून हजारो लोक शहरात येत होते. त्या गर्दीत रॉबिन आणि त्याचे सोबती केव्हाच आत सटकून गेले. कोणीही त्यांच्याबद्दल शंका घेतली नाही.

पण पुढे जेव्हा शर्यत सुरू झाली आणि प्रत्येक सामन्यात रॉबिन जिंकायला लागला. तेव्हा मात्र सर्वांचे डोळे त्याच्याकडे लागले.

कोतवालाने दाढी कुरवाळीत त्याच्याकडे पाहिले. अशी अचूक नेमबाजी करणारा एकच इसम साऱ्या इंग्लंडात आहे अशी त्याची खात्री होती. तो इसम म्हणजे रॉबिन हुड.

त्याने आपल्या खास शिपायांना खूण केली आणि आपली शस्त्रे सावरीत ते शिपाई हळूहळू पुढे आले. कोणालाही कळू न देता त्यांनी लवकरच रॉबिनभोवती एक साखळी तयार केली.

पहिले बक्षीस रॉबिनला मिळायचे होते. कोतवालाने रॉबिनला पुढे बोलावले. रॉबिन पुढे झाला. सोन्याचा बाण हातात घेण्यासाठी तो जरा खाली वाकला....

आपला शत्रू इतका हाताशी आलेला पाहून कोतवालाला राहावले नाही. त्याने आपला वाळकुडा हात रॉबिनच्या मानेवर ठेवला आणि त्याची मानगूट धरली.

"पकडा रे ह्या पुंडाला!"

पण कोतवालाचा हा हुकूम पुरता तोंडावाटे बाहेर निघतो न निघतो तोच मागून त्याच्या टाळक्यात असा एक सणसणीत तडाखा बसला, की त्याच्या मेंदूतले रक्तच गोठले. डोळ्यांची मिचमिच करीत त्याने मागे वळून पाहिले, तेव्हा धाकल्या जॉनची वळलेली मूठ त्याला दिसली. आणि

तो आपले गरगरणारे डोके जरा दाबतो आहे, तोच फडाडदिशी त्याच्या थोबाडात अशी एक चपराक बसली, की कोतवालाचे रोड शरीर जमिनीवर कोसळले. त्याचा एका काळचा सैंपाकी.... चक्कीवाल्याचा मुलगा मच ह्याने दिलेली ती चापटपोळी होती!

सबंध मैदानावर एकच हुल्लड झाली. कोतवालाच्या शिपायांना हे कळेना, की ह्यांतले पुंड कोणते नि गावकरी कोणते? उलट रॉबिनचे टोळकरी मात्र शिपायांना अचूक बडवीत होते. तेवढ्यात शहराच्या वेशी बंद करण्याचा पहारेकऱ्यांनी प्रयत्न केला. पण कोतवालाच्या लोकांप्रमाणे रॉबिनचे लोकही पहिल्यापासून सावध होते. ठिकठिकाणी पांगून त्यांनी मोर्चे धरलेले होते. वेशीजवळही काही गडी होतेच. त्यांनी सपासप वार करून अगोदर पहारेकऱ्यांना ठार केले. त्यामुळे त्यांचे सोबती जेव्हा लढत लढत दरवाज्यापाशी आले, तेव्हा त्यांना पळून जायला अगदी मोकळा रस्ता सापडला. लवकरच रॉबिन हुडची सबंध टोळी एखाद्या धबधब्यासारखी वेशीतून बाहेर पडली आणि मग हा प्रवाह बाणांचा वर्षाव करीत मागे हटायला लागला.

आणि तरी देखील त्यांना मोठी जोरदार लढाई द्यावी लागली.

आपली पुन्हा फजिती होऊ नये म्हणून नॉटिंगहॅमचे शिपाई हिरीरीने लढत होते. कोतवालाचे पाच शिपाई ठार झाले आणि दोन्हीकडच्या बऱ्याच लोकांना जखमा झाल्या.

रॉबिनचे चौघे सोबती विशेष घायाळ झाले होते आणि त्यांत.... धाकला जॉन होता.

वेशीपासून दूर गेल्यावर जंगल गाठेपर्यंत ज्याला जशी वाट मिळाली तसा तो धावत होता. रॉबिन आणि धाकला जॉन बरोबर होते.

एकाएकी शहराकडून एक तीर आला आणि धाकल्या जॉनच्या गुडघ्यात घुसला. जॉनने आर्त किंकाळी फोडली आणि पाय दाबीत तो खाली पडला.

रॉबिनने चटकन् तीर उपटून फेकून दिला. पण रक्त भयंकर वाहात होते. चालणे तर त्याच्याने शक्यच नव्हते.

तो विव्हळत म्हणाला, "रॉबिन, आतापर्यंत मी तुझी सेवा केली ना?"

"सेवा?" रॉबिनच्या डोळ्यांत पाणी उभे राहिले. त्याच्या तोंडातून शब्द फुटेना. "जॉन, तुझ्यासारखा सोबती कधी मिळेल तरी मला?"

"मग माझं ऐक.... कोतवालाचे शिपाई आपल्या मागावर आहेत. केव्हा येऊन मला पकडतील त्याचा नेम नाही. पण.... पण.... माझं शरीर त्या दुष्टांच्या हातात जिवंत पडेल असं करू नकोस. तुझी ती आवडती तलवार उपस नि उडव माझं डोकं!"

रॉबिन म्हणाला, "इंग्लंडमधलं सगळं सोनं कुणी माझ्यापुढे आणून ओतलं तरी ह्यांपैकी एकही गोष्ट मी करणार नाही!"

आणि असे म्हणून त्याने बाह्या वर सारल्या आणि अंगात असेल नसेल तेवढे बळ एकत्र करून धाकल्या जॉनचे प्रचंड शरीर उचलले.

ठेचाळत ठेचाळत वाट चालताना त्याला आर्थर मोची भेटला आणि मग दोघांनी मिळून धाकल्या जॉनला जंगलात टक संन्याश्याच्या झोपडीकडे नेले.

एकदा तेथे पोचल्यावर त्यांना कसलीही भीती नव्हती. मेरियन आणि ॲलनची बायको घायाळ सोबत्यांची मलमपट्टी करायला तयार होत्याच. धाकल्या जॉनची जखम फार खोल आणि काळजी करण्यासारखी होती. पंधरा दिवसांत तोही बरा होईल असे टक संन्याशाने सांगितले. तेव्हा रॉबिनला आनंद झाला. धाकल्या जॉननेही पडल्या पडल्या कण्हल्यासारखे केले.

रात्री हजेरीच्या वेळी एक नवीनच गोष्ट उघडकीला आली आणि सर्वांना धक्का बसला.

ती म्हणजे विली स्ट्यूटलीचा पत्ता नव्हता!

तिकडे त्याच रात्री नॉटिंगहॅमच्या वाड्यात कोतवालसाहेब फुशारकी मारीत होते.



"रॉबिन नाही, पण विली तर मिळाला! आता त्याला असा उंच ठिकाणी लोंबकळत फाशी देतो, की पाहाणाराचं धाबंच दणाणावं! पुन्हा रॉबिनची काही छाती होणार नाही डोकं वर करण्याची ....मला वाईट वाटतं ते एका गोष्टीचं. फुकटफाकट तो सोन्याचा बाण रॉबिनकडे गेला!"

पण कोतवाल हे बोलत असतानाच वाड्याच्या खिडकीतून एक बाण वाऱ्याच्या वेगाने आत आला आणि मेजात घुसला. कोतवालाने डोळे

फाडून त्याच्याकडे बघितले. तोच तो सोन्याचा बाण होता आणि त्याच्या पायथ्याच्या पिसांना एक चिट्ठी अडकवलेली होती.

चिट्ठीत लिहिले होते :

''दगाबाज पाजी इसमाकडून रॉबिन हुड बक्षिसे घेत नसतो आणि अशा लोकांना दयाही दाखवीत नसतो. तेव्हा सावध राहा.''





# १२

दुसऱ्या दिवशी बारा वाजता विली स्ट्यूटलीला फाशी द्यायचे होते. शहरात कडक बंदोबस्त होता. वेशीचे दरवाजे आज दिवसभर उघडणार नव्हते.

रॉबिनने आपले गडी पूर्वदरवाजाकडे पण जंगलातच एकत्र जमवले होते. मिडल तांबटाने मुद्दाम परजलेली धारेची तलवार प्रत्येकाजवळ होती. तिरकमठा होता, हे सांगायला नकोच! चटकन ओळखायला येऊ नये म्हणून प्रत्येकाने आपल्या हिरव्या झग्यावरून काळी कांबळी पांघरली होती.

काय करावे म्हणून रॉबिन विचार करीत होता; इतक्यात शहराच्या बाजूने एक तरुण भिक्षुक येताना दिसला. त्याच्या अंगात पायघोळ अंगरखा होता. डोक्याला मोठी थोरली काळी हॅट होती आणि तरी आपल्या अंगरख्याची कुंची एकसारखी वर ओढून तो आपले तोंड झाकल्यासारखे करीत होता. डाव्या हातातल्या काठीला एक क्रॉस लावलेला असून त्याने ती काठी खांद्यावर धरली होती आणि उजव्या हातातल्या जपमाळेचे मणी तो ओढीत होता.

विली स्ट्यूटलीचा भाऊ, म्हातारीचा दुसरा मुलगा पुढे झाला आणि त्याने विचारले, "आज म्हणे शहरात एका पुंडाला फाशी द्यायचंय. खरं का?"

"खरं!" त्याने दुसरीकडे पाहात सांगितले. "आत्ता मी त्या उंच टेकडीकडून आलो ना, तिथनं आतलं दिसतं. मुद्दाम एक उंच झाड निवडून त्याच्या खाली फाशीची तयारी केली आहे. मला ते बघवेना म्हणून मी आलो."

"बिचारा! मरताना त्याच्यासाठी मंत्र म्हणायला पण कुणी नाही." रॉबिन पुटपुटला. मग त्याने भिक्षुकाला म्हटले, "खरं पाहिलं तर तुम्ही तिथे थांबायचं नि तेवढं तरी समाधान त्याला द्यायचं. तो लठ्ठेश्वरभटजी थोडाच त्याच्यासाठी मंत्र म्हणणार आहे?"

"पण आत कसं जायचं?" तो भिक्षुक म्हणाला, "दरवाजे बंद आहेत."

रॉबिन बेपर्वाईने म्हणाला, "करू काही तरी. शक्ती आहे, युक्ती आहे!"

भिक्षुक जरा वेळ विचार करीत होता. तो एकदम म्हणाला, "तर मग चला. पण इकडून नको. ह्या पूर्वदरवाजावर सक्त पहारा आहे!...."

आणि बोलत बोलत त्याने त्यांना मागच्या वेशीकडे नेले. हाही दरवाजा बंदच होता; पण तो कधीच विशेष वापरात नसे. त्यामुळे तेथे उंच उंच वाळके रान वाढलेले होते. खंदकात पाणी होते, तेही अगदी सुकून गेले होते.

सर्वजण गवतात लपून राहिले. आर्थर मोची तेवढा पुढे गेला. वेशीच्या बुरुजाला लागून एक चांगली जाडजूड भक्कम वेल वर चढलेली होती. तिला लोंबकळून आर्थरने हा हा म्हणता वरचा बुरूज गाठला. नंतर दोन तडाखे हाणून तेथल्या चौकीदाराचा निकाल लावणे म्हणजे मिनिटभराचे काम होते. तेवढे झाल्यावर त्याच्या किल्ल्यांचा जुडगा

घेऊन त्याने सरळ तो मोठा लोखंडी दरवाजा उघडला. बाहेरच्याप्रमाणे आतही ह्या बाजूला शुकाशुकाट होता. कारण गावकऱ्यांची सगळी गर्दी दुसऱ्या कडेला फाशीच्या जागेकडे लोटली होती. त्याचा फायदा घेऊन ह्या उघडलेल्या दरवाजातून रॉबिनचे टोळकरी भराभर शहरात घुसले. आर्थर मोच्याने पुन्हा दरवाजा लावला.

थोड्याच वेळात विली स्ट्यूटलीला हत्यारबंद शिपायांनी ओढीत ओढीत नेले. त्याचे दोन्ही हात मागच्या बाजूला बांधलेले होते. विली बिलकूल न घाबरता धीटपणाने पावले टाकीत होता. पण त्याच्या चेहेऱ्यावर खिन्नता होती. तो आजूबाजूला पाही, तेव्हा लोक त्याच्याकडे बघत. पण ही कोरडी सहानुभूती आहे. आपल्याला मदत करण्याची कोणालाही छाती नाही हे त्याला माहीत होते.

त्याच्या पाठोपाठ भाले घेतलेले शिपाई जात होते आणि सर्वांत मागे घोड्यावर स्वार झालेले कोतवालसाहेब मोठ्या गुर्मीत दाढीचे खुंट उपटीत चालले होते. दुसऱ्या एका घोड्यावर लठ्ठेश्वरभटजी होते आणि तिसऱ्या एका घोड्यावर होती ती कजाग कोतवालकन्या.

विलीला शिपायांनी एका बैलगाडीत उभा केला आणि झाडाला लोंबणाऱ्या दोरीचे कडे त्याच्या गळ्यात अडकवले. आता तेवढी गाडी हालवून दूर नेली की....

पण तेवढ्यात एक नाजूक दिसणारा पोरगेला भिक्षुक पुढे आला आणि लठ्ठेश्वरभटजींपुढे वाकून म्हणाला, ''बिशपसाहेब, अपराध्याला फाशी देण्यापूर्वी देवाजवळ मंत्र म्हटले पाहिजेत!''

बिशपसाहेब गरम झाले.''ह्या.... ह्या.... बदमाषासाठी मंत्र?''

''मरताना कोणीच बदमाष राहात नाही.'' तरूण भिक्षुक शांतपणे म्हणाला, ''आपण मंत्र म्हणणार नसला तर मी म्हणतो.''

''म्हण!'' लठ्ठेश्वरभटजी किंचाळले, ''तुला ते पुण्य हवं असेल तर जरूर म्हण!''

लगेच तरुणाने चपळाईने गाडीत उडी मारली आणि जपमाळेचे मणी ओढीत त्याने तोंडाने काही तरी पुटपुट चालवली.

बराच वेळ त्याचे हे झेंगट चालले होते. तेवढ्यात रॉबिन हुडची सगळी तयारी पुरी झाली असावी. कारण चक्कीवाल्याचा मुलगा मच गर्दीतून घुसून एव्हाना पुढे आला होता आणि म्हणत होता, "जीते रहो, विली, जीते रहो!"

लगेच सगळीकडे एकच खळबळ उडाली.

"पकडा.... पकडा हरामखोरांना! रॉबिन हुड आलाय, नक्की रॉबिन हुड आलाय!"

कोतवालाने क्षणाचा वेळ न घालविता तलवार उपसली. आपल्या ह्या इरसाल सैंपाक्याची जीभ केव्हा एकदा छाटून टाकतो असे त्याला झाले होते. पण त्याच्या तलवारीचा पट्टा फिरायच्या आधीच मचने सुळकन त्याच्या घोड्याच्या पोटाखाली धडक मारली आणि दुसऱ्या बाजूने बाहेर पडून त्याचा हात हिसकला.

जी तलवार त्याचा जीव घेणार होती ती आता त्याच्या हातात आली. ती घेऊन त्यानेही गाडीत उडी टाकली; फासाच्या दोऱ्या तोडल्या आणि तलवार विली स्ट्यूटलीच्या हातात दिली.

सूडाच्या बुद्धीने विली नुसता जळत होता. तो नेहमीच्या दुप्पट शौर्याने लढला आणि त्याने सपासप कितीतरी शिपाई कापून काढले. तेवढ्यात दोघा भालाइतांनी विलीवर हल्ला केला होता. त्यांनी विलीला दोन बाजूंनी भोसकून ठारच केले असते; पण तेवढ्यात रॉबिन तेथे आला आणि तलवारीच्या एका वाराने त्याने भाला धरणाराचा तो हातच तोडून टाकला. त्याच वेळी कोणाचा तरी एक तीर सपाट्याने येऊन दुसऱ्या भालाइताच्या हातात घुसला आणि तोही जमिनीवर कोसळला.

नंतर अगदी हातघाईची लढाई झाली. कोतवालाच्या शिपायांना वाटत होते, की काही झाले तरी आज दरवाजे बंद आहेत. हे पुंड शहरात

कोंडलेले आहेत. लढून लढून किती लढतील? आता नाही तर मग पण त्यांचा फडशा होणार हे ठरलेलेच.

लढाई रंगात आली होती. इतक्यात शत्रूचा एक बाण जोराने आला आणि रॉबिनच्या मनगटात घुसला. तो तरुण भिक्षुक रॉबिनच्या अगदी जवळ उभा होता. त्याने ते पाहिले आणि घाबरून किंकाळी फोडली. पण रॉबिनने खालचा ओठ दातांनी दाबला, भात्यातून बाण काढला, धनुष्याला लावला आणि आपल्याला बाण मारणारा कोण हे नीट पाहिले.

कोतवालसाहेब अगदी खुषीत येऊन हसत होते. "छान झालं! बरं वाटलं आज अगदी! काय रॉबिन? आता ताकद आहे का पुन्हा धनुष्य ताणायची?"

पण रॉबिनने धनुष्य ताणले होते इतकेच नाही, तर बाण लावून सोडलाही होता आणि रॉबिनचा बाण कधी चुकायचा नाही; पण मनगट दुखावले असल्यामुळे ह्या वेळी चुकला. कोतवालसाहेबांची टोपी उडाली आणि डोक्याला किरकोळ जखम झाली.

पण तेवढ्याने शत्रूच्या सैन्यात एकच गोंधळ माजला आणि त्याचा फायदा घेऊन रॉबिन नि त्याचे सोबती पुन्हा पश्चिम दरवाजाकडे आले. तेथे आर्थर मोची चाव्या घेऊन तयार होता. त्याने दरवाजा उघडला आणि ही टोळी मोठ्या धूमधडाक्याने शरवुडच्या जंगलाकडे पसार झाली.

पण दरवाजा बंद करायला आर्थरला वेळ सापडला नाही. कारण तेवढ्यात कोतवालाचे काही स्वार दौडत तेथे आले. तेव्हा किल्ल्या फेकून देऊन आर्थर मोचीही आपल्या सोबत्यांना मिळाला आणि शरवुडकडे धावत सुटला.

वाटेत रॉबिनची जखम पुन्हा वाहायला लागली होती. त्या तरुण भिक्षुकाने झटदिशी एक छोटा रुमाल काढून रॉबिनच्या हाताला बांधला.

रॉबिन चमकला. त्याने तो रुमाल ओळखला होता आणि आता भिक्षुकालाही ओळखले होते.

"मेरियन!"

"मी काय करू, रॉबिन?" मेरियन त्याचा हात धरून त्याच्या डोळ्यांकडे पाहात म्हणाली, "मला ह्या मोहिमेवर यायचं होतं आणि तू तर येऊं दिलं नसतंस!"

रॉबिनने नुसते हसून तिच्याकडे पाहिले.

इतक्यात....

"बापरे! आपण सापडलो ....चांगलेच सापडलो!"

असे कोणीतरी ओरडले. रॉबिनने पाहिले. कोतवाल आणि त्याचे शिपाई तर जवळ येऊन पोचले होतेच, पण शिवाय उजवीकडे दुसऱ्याच एका सैन्याची हालचाल सुरू होती. ते पण शत्रूचेच सैन्य समजायचे का?

पण नाही. ते शत्रूचे सैन्य नव्हते. सरदारसाहेब सर रिचर्ड ह्यांचे ते सैन्य होते आणि सरदारसाहेब स्वतः रॉबिनला खुणा करून बोलवीत होते.

लगेच रॉबिन आपल्या रंगेल गड्यांना घेऊन तिकडे वळला आणि त्याने सरदारांच्या गढीत प्रवेश केला. सरदारसाहेब स्वागत करायला पुढे आले आणि सर्व मंडळी गढीत सुखरूप पोचल्यानंतर त्यांनी गढीचे दरवाजे लावून घेतले. नंतर आपल्या पाहुण्यांना त्यांनी बुरुजावरच्या बैठकीत नेले. तेथून बाहेरची गंमत छान दिसत होती.

आणि ती गंमत पाहाण्यासारखी होती खरीच. कारण रक्ताने न्हालेला बोडका कोतवाल मोठ्या तावातावाने येऊन हुकूम देत होता, "ए बेइमानी सरदारा! उघडतोस की नाही गढीचं दार की फोडू ते?"

"वॉरंट आहे तुझ्याजवळ?"

“वॉरंट ....वॉरंट?” कोतवाल क्रोधाने गुरगुरला, “मी नॉटिंगहॅमचा कोतवाल आहे, माहीत नाही? सरकारी अंमलदार आहे!”

“आणि मी सरदार आहे हे माहीत आहे तुला? तू अंमलदार असलास तर नॉटिंगहॅमचा! माझ्या गढीवर तुझी काही सत्ता नाही, समजलास? चालता हो इथून!”

आणि सर रिचर्ड हा फार मोठा सरदार आहे हे कोतवाल जाणून होता. त्यामुळे त्याने आणखी थोडी दमबाजी केली आणि मग आपले स्वार घेऊन आला तसा निघून गेला.

“रॉबिन ....दोस्त!” सर रिचर्ड रॉबिनला मिठी मारून प्रेमाने म्हणाले, “तू मोठ्या उदार मनाने दिलेल्या मेजवानीची आज फेड करणार आहे मी!”

आणि खरोखरच मोठ्या मानकऱ्याला शोभेल अशा थाटाची मेजवानी त्या रात्री सर रिचर्डकडे झाली. शरवुडकर मंडळी आधीच रंगेल.

त्यात नुकतीच लढून थकून आलेली. त्यामुळे त्यांनी अगदी उत्साहाने जेवणावर ताव मारला!

सरदारसाहेबांची स्थिती अलीकडे सुधारली होती आणि त्याचे सर्व श्रेय रॉबिनला होते. रॉबिनचे पुन्हा पुन्हा आभार मानून त्याचे चारशे पौंडही ते परत द्यायला लागले. पण रॉबिनने हसत हसत सांगितले, "मला ते अगोदरच परत मिळाले आहेत!"

पण सर रिचर्डनी प्रेमाने दिलेली दुसरी एक भेट मात्र रॉबिन हुडच्या टोळीला घ्यावीच लागली. सरदारसाहेबांनी ह्या मंडळींना मुद्दाम आपल्या शस्त्रागारात नेले. तेथे भक्कम कोरे चकचकीत एकशेचाळीस तिरकमठे आणि एकशेचाळीस भाते रांगेने मांडून ठेवले होते.

सरदारसाहेब म्हणाले, "हे तुमचे आहेत!"

रंगेल गड्यांनी त्यांचा जयजयकार केला. लाखो नाण्यांच्या थैल्या त्यांच्यापुढे आणून कोणी ओतल्या असत्या तरी त्यांना इतका आनंद झाला नसता!

# १३

काळाचे चक्र एकसारखे फिरत असते. रिचर्ड राजा युद्धावर गेलेला होता, तोपर्यंत इकडे राजपुत्र जॉनची पोळी पिकली होती. पण आता सगळे पारडे फिरले. जॉनने केलेल्या जुलुमांची हकीकत रिचर्डला कळलीच होती. ज्या लोकांचे जॉनने नुकसान केलेले असेल त्यांना आपण भरपाई देऊ असे रिचर्डने जाहीर केले. त्यामुळे लोकांना आनंद झाला.

इकडे नॉटिंगहॅमचा कोतवाल मात्र अजून आपल्याच मिजाशीत होता. सर रिचर्डने आपल्या शिपायांदेखत आपला अपमान करावा हे त्याला मुळीच आवडले नव्हते. त्याने ठरवले, की राजेसाहेबांची गाठ घ्यायची आणि सर रिचर्डने पुंडांच्या टोळीला आसरा दिला आहे ही बातमी त्यांच्या कानांवर घालायची म्हणजे महाराज नक्कीच रिचर्डला शासन करतील.

त्याप्रमाणे त्याने केलेही. पण त्याचा परिणाम निराळाच झाला. राजेसाहेबांनी रॉबिन हुडबद्दल, तो पूर्वीचा कोण, कोठला ह्याबद्दल खोदखोदून प्रश्न विचारले आणि स्वतःच्या मनाशी काहीतरी बेत केला.

"ही तुम्ही जी शर्यत ठेवली होती," राजेसाहेब विचार करीत म्हणाले, "तिच्यात भाग घ्यायला सर्वांना मोकळीक होती ना?"

"होय सरकार."

"सर्वांना म्हणजे कुणालाही. पुंडांना सुद्धा...."

"होय. पुंडांना आम्ही माफी जाहीर केली होती. पण त्याचं असं झालं सरकार...."

"काय असं झालं नि तसं झालं?" राजेसाहेब ताडदिशी सिंहासनावरून उठून म्हणाले. त्यांचा संताप अगदी अनावर झाला होता. "शरम नाही वाटत माझ्याजवळ येऊन सांगायला? ज्यांना तुम्ही माफी जाहीर केलीत आणि त्या विश्वासावर येऊन ज्यांनी शर्यतीत भाग घेतला, त्यांना तुम्ही दगाफटका करून पकडता? बेशरम, बेइमान, भेकड कुणीकडचे!"

राजेसाहेबांचा तो रुद्रावतार पाहून कोतवालाची गाळण उडाली. आपण करायला गेलो काय आणि हे झाले काय असे त्याला वाटले. पण लवकरच महाराज जरा शांत झाले आणि म्हणाले, "तरी पण पुंडगिरीला उत्तेजन द्यायची आमची इच्छा नाही. तुम्ही जा आता परत. आम्ही स्वतः एकदा तिकडे येऊ नि पाहू काय ते."

कोतवाल बिचारा हात चोळीत परत गेला.

राजेसाहेबांनी बोलल्याप्रमाणे केले. काही निवडक स्वार बरोबर घेऊन ते शरवुडच्या बाजूला गेले.

पहिल्याने सर रिचर्डच्या गढीला त्यांनी भेट दिली. सरदारसाहेब ह्या अचानक भेटीने चकित झाले. पण राजेसाहेबांचे त्यांनी थाटाने स्वागत केले.

जेवणखाण झाल्यावर राजेसाहेब म्हणाले, "रिचर्ड, ह्या रॉबिन हुडला हुडकायला मी एकटाच पुढे जाणार आहे. मी परत आलो नाही तर तू दोन दिवसांनी सैन्य घेऊन नीघ."

आणि असे म्हणून ते घोड्यावर स्वार होऊन निघाले सुद्धा.

सर रिचर्डवर त्यांचा पूर्ण विश्वास होता आणि त्याने रॉबिन हुडबद्दल जी माहिती सांगितली होती, ती ऐकल्यावर रॉबिनला भेटायची त्यांना फार उत्सुकता लागली होती. कोतवाल सांगतो त्याप्रमाणे हा मनुष्य एकदम पुंड नसावा, नाहीतर रिचर्ड त्याच्याबद्दल इतके चांगले बोलला नसता. लोकांतही रॉबिन हुडची वाहवा होत असते. तेव्हा असा हा विलक्षण मनुष्य आहे तरी कोण बुवा?

विचार करीत करीत राजेसाहेब जंगलातून चालले होते. काही वेळाने अंधार पडला. वाट दिसेना. अडचणीत भर म्हणून एकदम पावसालाही सुरुवात झाली. राजेसाहेबांनी अंगात चिलखत घातले होते आणि डोक्याला जिरेटोप होता. त्यामुळे ते भिजले नाहीत. पण घोडा मात्र ओलाचिंब झाला आणि पुढे जायला कुरकुरू लागला.

सुदैवाने लवकरच त्यांना एक झोपडी लागली. लगेच घोड्यावरून उतरून त्यांनी झोपडीच्या दारावर थाप मारली, तेव्हा आत एक कुत्रा भुंकायला लागला.

"कोण रात्रीचा त्रास द्यायला आला बुवा?" असे चरफडत संन्यासीबुवा टक ह्यांनी दार उघडले.

संन्यासीबुवा धाकल्या जॉनला पूर्ण बरा करून नुकतेच झोपडीत परत आले होते आणि विसावा घेत होते. कुत्रा त्यांच्या पायाशीच बसला होता. धाकल्या जॉनची जखम आता भरून आलेली होती. तरी त्याला विश्रांतीची जरूरी होती. पण धाकल्या जॉनला तर असे झाले होते की आपण केव्हा एकदाचे उठून भटकायला लागतो! तेव्हा जॉनची चुळबुळ थांबवायला एकच उपाय होता आणि टकने तो

अंमलात आणला होता. आपल्या लठ्ठ लठ्ठ पोथ्या आणि लठ्ठसे शरीर घेऊन संन्यासीबुवा खुशाल त्याच्या छातीवर बसत आणि स्वस्थपणे पुस्तके वाचीत.

आता जॉनची अशी विचित्र शुश्रूषा करून संन्यासीबुवा नुकतेच थकून भागून घरी आले होते. त्यांनी चरफडत दार उघडले.

पाहातात तो काळे चिलखत घातलेला एक स्वार!

"कोण रे तू? आणि ह्या भलत्या वेळेला काय तुझं काम इथे?"

स्वाराने जिरेटोप काढून हातात घेतला आणि करड्या आवाजात म्हटले, "मला नि माझ्या घोड्याला रात्रीपुरती निजायला जागा हवी आहे. घासभर जेवणही मिळालं तर फारच चांगलं."

"तुझ्या बापानेच ठेवलीय की नाही जागा! आणि हे काय अन्नछत्र आहे होय, तर तुला रात्री अपरात्री जेवण मिळेल!"

पण संन्यासीबुवाच्या ह्या बोलण्याकडे लक्ष न देता त्यांच्या कुत्र्याला बाजूला ढकलून पाहुणा खुशाल आत घुसला होता. संन्यासीबुवांची बडबड चाललीच होती, "बाबा रे! तू पडलास मोठा सरदार! माझ्या गरिबाच्या घरी तुझा घोडाही झोपायला कुरकुरेल. कशाला मरायला इथे आलास? चालता हो ना..."

पण पाहुण्यांच्या कानांना जणू काही बुचे बसलेली होती. त्यांनी आत शिरून आपले कपडे उतरून ठेवले होते आणि ते म्हणत होते, "मला झोपायला नुसती घोंगडी अंथरलीत तरी पुरे आहे. घोड्याला तेवढं बाहेर छपराखाली बांधून ठेवा नि थोडं गवत टाका त्याच्या पुढे म्हणजे झालं!.... आणि अरे वा! वास तर मोठा खमंग सुटलाय! आणि म्हणे खायला काही नाही!"

टकला पाहुण्यांच्या ह्या 'शिष्ट'पणाचा राग आला तितकेच नवलही वाटले. पण त्याने तोंडाने कितीही बडबड केली तरी अशा पावसाच्या रात्री दाराशी आलेल्या प्रवाश्याला हाकलून लावण्याइतका तो दुष्ट

नव्हता. तो म्हणाला, "ठीक आहे. इतकी मिजास आहे काय तुला? रात्रीची वेळ आहे, देतो राहू. पण आपल्यात श्रेष्ठ कोण ह्याचा उद्या फैसल्ला करू आपण!"

त्याने मग आल्या प्रसंगाला तोंड द्यायचे ठरवले. पाहुण्यांचा घोडा नेऊन बाहेर ओटीजवळ बांधला, त्याचे अंगही खरखरून पुसले आणि त्याच्यापुढे थोडे गवत टाकले. मग आत येऊन त्याने मेजावर दोघांसाठी जेवण वाढून घेतले.

जेवताना कोणी काही बोलले नाही. हरणाच्या मांसावर आणि गावठी दारूवर पाहुणे खुष होते. त्यांनी खुशाल आडवा हात मारला आणि जेवण झाल्यावर कोपऱ्यातल्या घडवंचीवर ताणून दिली.

टक त्याच्याकडे पाहातच राहिला. पण मग तोही थकला होता; म्हणून त्यालाही झोप लागली.

सकाळी उठून पाहातो तो पाहुणे केव्हाच उठलेले आहेत आणि त्यांनी झोपडी झाडून स्वच्छ केली असून सैंपाकही अर्धाअधिक शिजविला आहे! तेव्हा मात्र बुवा आपला राग विसरले आणि पाहुण्यांशी अगदी हसत हसत गप्पा मारायला लागले.

पावाला लोणी लावीत पाहुण्यांनी सांगून टाकले, "खरं सांगू बुवा? मी आलोय रॉबिन हुडला भेटायला. पण बेटा कुठे राहातो कुणास ठाऊक! ....तुम्हांला माहीत आहे का?"

मोठ्या थोरल्या बंपरमधून गरम चहाचा घोट घेत बुवांनी विचारले, "कशाला भेटायचय रॉबिन हुडला?"

"मी राजेसाहेबांकडून एक निरोप आणलाय !"

"अस्सं...." बुवा विचार करीत म्हणाले, "मीच घेऊन जाईन तुम्हांला त्याच्याकडे. काही झालं तरी आम्ही ह्या भागात राहातो. थोडी फार माहिती आहेच ह्या भागाची! ....पण पुंडाशी संबंध बिंबंध काही नाही बरं का आपला!"

"समजलं ....समजलं."

टक स्वतःशी विचार करीत होता. 'राजेसाहेबांकडून निरोप आणलाय काय? ठीक आहे. हे खरं असेल तर ह्याची नि रॉबिनची गाठ घालून



दिलीच पाहिजे. रॉबिन केवढाही पुंड असला तरी राजनिष्ठ आहे. विशेष म्हणजे रिचर्ड राजाबद्दल तर त्याची भक्ती काही विलक्षणच! बरं पाहुणे थापाच मारीत असले तरी काही बिघडलं नाही. चांगले गबर दिसतात. यथास्थित लुटू त्यांना.'

तेव्हा पाहुणे घोड्यावर आणि संन्यासीबुवा आपल्या खेचरावर स्वार होऊन निघाले. तीनचार मैलांवर खुद्द रॉबिनच त्यांना भेटला. रस्त्याच्या कडेला झाडाआड लपून तो येणाराजाणारावर नजर ठेवीत होता. ही जोडी येताना दिसली तेव्हा रॉबिनने लगेच ओळखले, की संन्यासीबुवांनी आपल्यासाठी शिकार आणलेली दिसते!

तो पुढे झाला आणि त्याने पाहुण्यांना हटकले, "कोण रे तू? ....इकडे कुठे वाट चुकलास?"

पाहुण्यांनी लगाम खेचला आणि तलवारीकडे हात नेत कठोर आवाजात म्हटले, "मला अशा तऱ्हेने हटकून घेण्याची सवय नाही, समजलास? एकटा माणूस तर मला कधीच हटकू शकत नाही."

रॉबिन त्याच्या धीरगंभीर चेहेऱ्याकडे पाहातच राहिला. मग म्हणाला, "ठीक तर ही घ्या आणखी माणसं." असे म्हणून त्याने टाळी वाजवली.

लगेच आसपासच्या झाडीतून आणखी दहा तिरंदाज प्रगट झाले आणि त्यांनी पाहुण्यांना वेढा दिला.

पाहुणे म्हणाले, "बराच करडा अंमल दिसतो तुझा! मी कोण विचारतोस ना? मी खुद्द राजेसाहेबांकडून निरोप घेऊन आलोय. राजेसाहेब जवळपासच आलेले आहेत. त्यांना रॉबिन हुडला भेटायचंय!"

हे ऐकल्याबरोबर रॉबिन हुडचा सगळा ताठा नाहीसा झाला. तो एकदम नम्र बनून म्हणाला, "तर मग मी त्यांना भेटायला यायला केव्हाही तयार आहे. राजेसाहेबांनी आज्ञा द्यावी."

पाहुण्यांनी त्याच्याकडे सूक्ष्म नजरेने बघितले. एकाएकी त्यांना रॉबिन हुड अतिशय आवडू लागला होता. रॉबिनचेही पाहुण्यांविषयी चांगले मत झाले होते. तो म्हणाला, "सरदारसाहेब, आपण इथवर आला आहा तर माझ्याकडची न्याहारी खाल्याशिवाय जाऊ नये अशी विनंती आहे."

"न्याहारी!" मोठ्याने हसून पाहुणे म्हणाले, "रॉबिन, तुझ्याकडच्या मेजवानीची कीर्ती सगळ्या इंग्लंडभर पसरलेली आहे. पण ती फुकट नसते म्हणे. दक्षिणा द्यावी लागते पाहुण्यांना!"

"राजेसाहेबांकडून खास निरोप घेऊन आपण आलात. आपल्याला तो नियम लागू नाही. पण आम्ही दक्षिणा घेतो हे मात्र खोटं नाही. त्याचं

असं आहे सरदारसाहेब....'' असे म्हणून रॉबिनने मुक्कामावर जाता जाता आपली आणि आपल्या टोळीची सगळी माहिती सरदारसाहेबांना सांगितली.

आपण लूटमार करीत असलो तरी गरिबांच्या वाटेला कसे जात नाही, श्रीमंतांचे घेतो आणि गरिबांना कसे देतो, सरकारी अंमलदार जुलूम करतात म्हणूनच आपल्याला पुंड कसे बनावे लागले, वगैरे सर्व त्याने पाहुण्यांना समजावून सांगितले. रॉबिनचा पराक्रम आणि त्याचा सज्जन, दिलदार स्वभाव पाहून पाहुणे अगदी खुष झाले.

मेजवानी नेहमीप्रमाणे थाटात पार पडली, गाणे बजावणेही झाले. आणि सर्व कार्यक्रमांत इंग्लंडच्या त्या राजाने अगदी साध्यासुध्या माणसाप्रमाणे भाग घेतला.

नंतर निशाणबाजीच्या शर्यती होत्या. त्यासाठी दूर अंतरावर एका दरडीत एक उंच कडब्याची काठी रोवली होती. काठीच्या शेंड्यावर एक फुलांची माळ अडकावली होती. ह्या माळेतून प्रत्येकाने तीर मारायचा होता. ज्याचा नेम चुकेल त्याला शिक्षा म्हणून संन्यासीबुवा टक ह्यांच्या गुबगुबीत हाताचा एक गुद्दा मिळायचा होता.

संन्यासीबुवा बाह्याबिह्या सरसावून तयार झाले तेव्हा पाहुणे डोळे मिचकावून म्हणाले, ''यजमान, हे चांगलं आहे आपलं धर्मकार्य!''

धाकला जॉन, तांबडा वुइल, ॲलन, विली स्ट्यूटली, सर्वांनी अचूक नेम साधला. पण बिचाऱ्या मिडल तांबटाचा बाण मात्र तिरपा जाऊन कोठे तरी पडला!

मिडलसाहेब घाबरले. बुवांचा तडाखा जणू काही आधीच आपल्या पाठीत बसला आहे, असे रडवे तोंड करून ते झपाट्याने बाजूला झाले. पण अशाने आपत्ती चुकते थोडीच?

आर्थर मोची आणि विली स्ट्यूटली पुढे झाले. त्यांनी पळणाऱ्या मिडलला पकडला आणि ते धूड बुवांपुढे आणून ठेवले. बुवांनी मूठ

सरसावली आणि दिला एक सणसणीत ठोसा त्याच्या थोबाडात! मिडल तांबट जो गडगडत दरडीत गेला तो पाच मिनिटे निपचित पडून होता. रंगेल गड्यांनी त्याची हुर्यो करून सगळे अरण्य हादरून सोडले.

रॉबिनचा नेम कधी चुकायचा नाही अशी सगळ्यांची खात्रीच. पण आज काय त्याचे नशीब बिघडले होते, कोणास ठाऊक! माळेपासून जवळ जवळ तीन बोटे अंतरावरून रॉबिनचा बाण गेला.

"ओहो!" सगळेजण एक साथ ओरडले.

रॉबिन चिडला आणि त्याने धनुष्य उचलीत तो म्हणाला, "मला वाटलंच.... मघाच्या बाणाची पिसं बरोबर लावलेली नव्हती. आता बघा हं...."

आणि असे म्हणत त्याने एका मागून एक असे तीन तीर सर सर सोडले होते आणि ते तिन्ही तीर माळेतून पलीकडे गेले होते. सर्वांनी आरडून ओरडून रान डोक्यावर घेतले.

पाहुणे अगदी चकित झाले होते.

ते म्हणाले," मी सबंध युरोपचा प्रवास केला आहे. पण अशी निशाणबाजी कुठे पाहिलेली नाही."

तांबडा वुइल पुढे झाला आणि म्हणाला, "हे सगळं ठीक झालं रॉबिन. पण तुझा पहिला नेम चुकला आहे. तेव्हा तुला दंड दिलाच पाहिजे ....हं, टकबुवा! द्या आपला धपाटा!"

मी तुम्हांला सांगितलेच आहे, की रॉबिन थोडा गर्विष्ठ होता. आपल्या सगळ्या टोळकऱ्यांदेखत टककडून थोबाडात खायला तो तयार होईना.

त्याने हसत पण स्पष्ट सांगितले, "मी टोळीचा पुढारी आहे. टोळीच्या एका इसमाने माझ्या थोबाडीत मारावी हे बरोबर नाही!"

त्यावर काही लोकांनी गिल्ला केला, "ते काही नाही! जो इतरांना कायदा तोच पुढाऱ्यालाही कायदा! पुढारी पुढारी म्हणजे कोण असा?"

पण रॉबिन म्हणाला, "मी एक वेळ ह्या पाहुण्यांकडून थप्पड खाईन. कारण ते राजेसाहेबांकडून आलेले आहेत; पण टकचा धपाटा खाणार नाही!"

आता टक जोशात उठला.

"तुला त्या उपटसुंभ पाहुण्यांची थप्पड माझ्या ठोशापेक्षा गोड लागते काय? असेल महाराजांकडून आलेला. म्हणून काय झालं? तो राजाचा सेवक असला तर मी देवाचा पुजारी आहे. त्याच्यापेक्षा मीच श्रेष्ठ आहे!"

पाहुणे उठून म्हणाले, "हा वाद हवाच कशाला? ....बुवा, एकदा तुमची आमच उडायलाच हवी! तुम्हीच म्हणाला होता ना रात्री की श्रेष्ठ कोण ते आपण सकाळी ठरवू?"

रॉबिन म्हणाला, "छान, छान! झाली पाहिजे!"

सर्वांनाच हा विचार पसंत पडला आणि ही ठोसाठोशी पाहाण्यासाठी सगळे टोळकरी जवळ आले.

पहिला ठोसा बुवांनी दिला. त्यांनी मूठ वळून पाहुण्यांच्या कानाजवळ असा तुफानी गुद्दा हाणला की ज्याचे नाव ते! रॉबिनला वाटले, आपली चूक झाली जरा. हे पाहुणे काही आता जिवंत सुटत नाहीत!

पण त्या गुद्द्यामुळे पाहुण्याचे शरीर थोडे डळमळले खरे.... पण थोडेच. पुन्हा सरदारसाहेब ताठ उभे राहिले आणि त्यांनी हसत हसत आपल्या तोंडावरून हात फिरवला.

"आता तयार राहा...." असे म्हणून त्यांनी आपली बाही वर केली आणि मग त्यांच्या दणकट हाताने बुवांच्या लठ्ठ गालावर असा सणसणीत तडाखा दिला, की बुवांचा वाटोळा देह खाली कोसळला आणि गडगडत दरडीत गेला.

"शाबास पट्ठे!" असे ओरडत रॉबिनच्या दोस्तांनी आनंदाने उड्या मारल्या.

रॉबिन मात्र डोळे फाडफाडून पाहात राहिला. पाहुण्यांचा दणका असा असेल तर त्यापेक्षा सरळ टकची थप्पड आपण खाल्ली असती तर बरे झाले असते असे त्याला वाटले. आगीतून निघून आपण हे फुफाट्यात मात्र पडलो!

पण सुदैवाने त्याला शिक्षेची माफीच मिळणार होती. कारण त्याच वेळी दुरून काही स्वार येताना दिसले. जवळ आल्याबरोबर त्यांनी घोड्यावरून उड्या टाकल्या आणि पाहुण्यापुढे अतिशय अदबीने वाकून मुजरे केले.

त्यांचा मुख्य सर रिचर्ड होता. त्याच्याकडे आश्चर्याने पाहात रॉबिन उद्गारला, "आ? हा काय प्रकार आहे?...."

"रॉबिन!" सर रिचर्ड म्हणाले, "तू महाराजांना ओळखत नाहीस?"

"महाराज!"

एक क्षणभर सगळीकडे विलक्षण शांतता पसरली. शरवुडचे ते रंगेल गडी आयुष्यात कधीही इतके शांत दिसले नव्हते.

मग रॉबिन भानावर आला.

पुढे होऊन त्याने लवून त्रिवार मुजरा केला.

"महाराज...." तो हलक्या आवाजात म्हणाला, "क्षमा करा. आम्हांला कल्पनाही नव्हती...."

संन्यासी टक रुमालाने घाम पुशीत कसाबसा बोलला, "राजेसाहेब ....ह्या द.....द.... दासाकडून चूक झाली...."

"दासाकडून?" राजेसाहेब खो खो करून हसत म्हणाले, "बुवा, तुम्ही तर देवाचे पुजारी ना? आमच्यापेक्षा श्रेष्ठ!"

बुवांनी लाजून खाली मान घातली.

रॉबिन अजून एक गुडघा टेकून अदबीने वाकला होता. त्याने आता भानावर येऊन डोक्याची टोपी काढून हवेत भिरकावली.

"बोला, राजेसाहेब रिचर्डमहाराज की...."

"जय!"



किती तरी लाल टोप्यांनी हवेत उड्डाण केले आणि राजेसाहेबांच्या जयजयकाराने अरण्यातल्या पशुपक्ष्यांच्याही क्षणभर कानठळ्या बसल्या.



# १४

इंग्लंडचा राजा, सिंहासारखा पराक्रमी आणि शूर, पण दयाळू अंतःकरणाचा रिचर्ड, स्वतः जातीने आपल्यामध्ये हजर आहे ही गोष्ट किती तरी वेळ रॉबिनला खरी वाटली नव्हती. पण आपण स्वप्न पाहात नाही, सत्य पाहात आहो एवढी एकदा खात्री झाल्यावर त्याचा आनंद शरवुडच्या अफाट अरण्यात मावेना. त्याला अगदी गहिवरून आले. कारण रॉबिन हुड लुटारू असला तरी रक्ताचा इंग्रज होता आणि आपल्या राजाबद्दल त्याला काही विलक्षणच अभिमान वाटत असे. कोणापुढेही न वाकणारी रॉबिनची मान राजापुढे तेव्हाच वाकली.

"महाराज," रॉबिन पुन्हा नम्रतेने म्हणाला, "मी नि माझे एकशेचाळीस लढवय्ये आपल्या सेवेला हजर आहो. आम्ही जे गुन्हे केले असतील त्याबद्दल आपण द्याल ती शिक्षा आम्ही भोगू."

राजेसाहेबांनी त्या शूर उमद्या तरुणांच्या टोळीवरून दृष्टी फिरवली. "काय रे, तुमचा पुढारी म्हणतो ते कबूल आहे तुम्हाला?"

"कबूल!" हातातल्या तलवारी उंच करून सर्वांनी उच्च स्वरात उत्तर दिले.

"ह्यापुढे लूटमार करणार नाही?"

"नाही!"

"दरबारची सेवा कराल?"

"करू!"

"घ्या तर मग शपथ."

सर्वांनी एकसाथ गुडघे टेकून आपल्या तलवारी आडव्या धरल्या आणि शपथ घेतली. नंतर रॉबिनने खूण करताच पुन्हा एकवार राजेसाहेबांच्या नावाचा जयघोष झाला. तो अपूर्व देखावा पाहून महाराजांचे हृदय भरून आले.

"रॉबिन," ते म्हणाले, "तुमची ही तयारी पाहून मला फार आनंद झाला. सच्चा तिरंदाज मला नेहमीच आवडतो. त्याला शिक्षा द्यायची म्हणजे माझ्या जिवावर आलं असतं. पण हे आता ठीक झालं. मी तुम्हांला पूर्ण माफी दिलेली आहे. पण ह्यापुढे....

"एवढं मात्र लक्षात ठेवा, की रानात जाता येता अशी हरणं मारायला मिळायची नाहीत." बोलता बोलता राजेसाहेब किंचित हसले. पण लगेच पुन्हा गंभीर होऊन म्हणाले, "पण तशी तुम्हांला आता जरूरही पडणार नाही. कारण तुमची सर्वांची माझे खास तिरंदाज म्हणून मी नेमणूक करतो आहे. सध्या काही सरदारांबरोबरचे खाजगी तंटे मिटवायचे आहेत. तेवढं काम झालं, की तुमच्यापैकी निम्म्यांना मी ह्याच शरवुडच्या जंगलाचे राखणदार म्हणून पाठवून देईन. पण मग.... ज्या हरणांना इतके दिवस मारलंत त्यांच्याच बांधवांची तुम्हांला राखण करावी लागेल, बरं का?"

"जरूर! जशी सरकारची आज्ञा!!"

असे म्हणून सर्वांनी पुन्हा एकदा राजेसाहेबांचा जयजयकार केला.

रिचर्ड राजाचे औदार्य पाहून रॉबिनचे टोळकरी अगदी खुष झाले होते. पण झाले हे काहीच नाही. राजेसाहेबांनी त्यानंतर जे गोड हुकूम फर्मावले त्यामुळे तर लोकांच्या आश्चर्याला आणि आनंदाला सीमा राहिली नाही.

धाकला जॉनची त्यांनी नॉटिंगहॅमचा कोतवाल म्हणून नेमणूक केली. तांबड्या वुइलला क्षमा करून 'आपली दौलत सांभाळायला घरी जा' म्हणून सांगितले. शिवाय 'लंडनला जो दरबार भरेल त्याला हजर राहा, तुला सरदारकी देईन,' असेही त्याला आश्वासन दिले. विली स्ट्यूटलीला त्यांनी दरबारी तिरंदाजांचा नायक नेमले.

नंतर त्यांनी संन्यासीबुवा टक ह्यांना पुढे बोलावले.

टक पुढे झाला आणि नम्रतेने वाकून म्हणाला, "महाराजांच्या पवित्र देहावर मी हात टाकला. सरकार, हुकूम करा, आत्ता माझ्या तलवारीने हा हात तोडून ठेवतो."

राजेसाहेब हसून त्याच्या पाठीवर थाप मारीत म्हणाले, "त्याच्या आधी तुमच्याकडे आम्ही जो पुख्खा झोडलाय त्याची फेड कशी करायची? ....बुवा, तुम्हांला बिशप करू का कुठचा तरी?"

पण बुवांना मानपान नको होता. खायला भाकरी, प्यायला सांबारे आणि राहायला झोपडी मिळाली म्हणजे त्यांना बस्स होते.

पुढे ॲलन-अ-डेलची पाळी होती.

राजेसाहेबांनी त्याच्याकडे बराच वेळ रोखून पाहिले.

"प्लिम्पटनच्या देवळात गोंधळ उडवून नवरी मुलगी पळवणारा तूच ना? ....आणि हीच नाही का तुझी बायको? बोला, तुमचं काय म्हणणं आहे?"

"काही नाही," ॲलन म्हणाला, "सरकारनी वाटलं तर आम्हांला शिक्षा करावी. तिचं माझ्यावर प्रेम होतं नि माझं तिच्यावर प्रेम होतं. हाच आमचा गुन्हा. मी हिला पळवलं नसतं तर त्या म्हाताऱ्या

सरदाराने हिच्याशी लग्न लावलं असतं ....केवळ हिची इस्टेट मिळवण्यासाठी!"

"आणि ती इस्टेटही शेवटी हरफर्डच्या बिशपने जप्तच केली आहे, नाही का?" राजेसाहेब विचार करीत म्हणाले, "ती अर्थात तुमची तुम्हांला परत मिळेल आणि जर कधी दरबारात सारंगीवाल्याची जरूर पडली तर.... न विसरता ये, बरं का? ....बायकोला घेऊन! ....खरंच, बायकांवरून आठवण झाली." राजेसाहेब एकदम रॉबिनकडे वळले. "रॉबिन, तुझी पण एक छोकरी होती, नाही का? ....दरबारात पाहिलेलं आहे मी तिला ....मेरियन ....मेरियन म्हणून? तिचं काय झालं रे? की विसरलास तिला?"

पुरुषी वेषातली मेरियन एकदम पुढे झाली आणि म्हणाली, "नाही सरकार. रॉबिन मला विसरलेला नाही."

"ओहो! ....आपण का मेरियन?" राजेसाहेब एक पाऊल मागे सरकून म्हणाले, "तरी.... मला जरा शंका आलीच होती.... पण तूही इथेच भेटलीस हे छान झालं. मी तुमच्या हंटिंग्डनच्या इस्टेटीबद्दल पुष्कळ ऐकलेलं आहे. तुमच्या बापांनी जन्मभर एकमेकांचं वैर केलं ना रे? त्याचं हे उट्टं फेडता आहा वाटतं? ....वाईट नाही, वाईट नाही! मीही तुम्हांला थोडासा हातभार लावतो...." असे म्हणून राजेसाहेबांनी रॉबिन आणि मेरियन ह्यांची टाळ्यांच्या गजरात हातजुळवणी करून दिली. शरवुडच्या इतिहासात सोन्याच्या अक्षरांनी लिहिण्यासारखा तो दिवस होता.

पण सोन्याचा कशाला म्हणू? रॉबिन हुडसारख्या वनवासी वीराला सोन्याचे प्रेम होते कधी? त्यापेक्षा ज्या अरण्यात तो लहानाचा मोठा झाला आणि मोठा असूनही मुलासारखा लहान राहिला त्या तेथल्या वनश्रीच्या हिरव्या जिवंत अक्षरांनी असेच का म्हणू नये? आणि रॉबिनचा आवडता झगाही त्याच हिरव्या रंगाचा नव्हता का?

दिवसापेक्षाही ती रात्र शरवुडच्या रंगेल गड्यांनी मोठ्या मौजेत घालवली. शेकोटीजवळ बसून भल्या पहाटेपर्यंत त्यांच्या गप्पा गोष्टी, खाणी पिणी आणि नाच गाणी चालली होती आणि त्या साऱ्या गमतीजमतीत त्यांचा राजा अगदी मोकळ्या मनाने एखाद्या सामान्य माणसाप्रमाणे भाग घेत होता.



# १५

रॉबिन हुडचे लग्न झाले. तेव्हा खरे म्हणाल, तर गोष्ट आता संपली आहे. फार तर 'ती सुखाने संसार करू लागली' एवढे सांगायचे आणि लेखणी खाली ठेवायची!

पण ही काही राजाराणीची गोष्ट नाही. खराखुरा इतिहास आहे आणि इतिहास कधी लग्नाने संपत नसतो.

शिवाय रॉबिनशी आपली इतकी गट्टी जमलेली आहे, की त्याचे पुढे काय झाले हे जाणून घ्यायची तुमच्यापैकी पुष्कळांना इच्छा असणार अशी माझी खात्री आहे.

पुढे काय होणार? कोणाच्याही आयुष्यात शेवटी काय होते?

शेवटी रॉबिन हुड मेला. त्यात विशेष काही नाही. प्रत्येक माणूस मरतोच आणि आज रॉबिन हुड जिवंत नाही तेव्हा तो मेलेला आहे हे नक्कीच. पण तो कधी मेला, कसा मेला हे समजून घेण्याची उत्सुकता आपल्याला आहे. होय की नाही? चला तर मग. ज्या प्रेमाने आपण आतापर्यंत रॉबिन हुडच्या संगतीत खेळलो, बागडलो, त्याच प्रेमाने त्याची मृत्युशय्या गाठू या. ज्या आपलेपणाने आपण त्याच्यासाठी

आनंदाश्रू ढाळले त्याच आपलेपणाने आपण त्याच्यासाठी रडू या. तरच आपण त्याचे खरे मित्र ठरू.

रॉबिनचे लग्न झाले. त्याची इस्टेटही त्याला परत मिळाली. रॉबिन हुड पुन्हा हंटिंग्डनचा सरदार झाला. दरबारात त्याला मान मिळू लागला. पण आपल्या जंगली गड्यांना तो कधी विसरला नाही किंवा मेरियनही कधी विसरली नाही.

पुष्कळदा रॉबिनला शरवुडच्या अरण्यात मजेने घालवलेले ते स्वातंत्र्याचे दिवस आठवत आणि त्याला खिन्न उदास वाटे. पिंजऱ्यातल्या पोपटासारखी बिचाऱ्याची स्थिती झाली. तुम्हांला ती अन्योक्ती आठवते ना?-

स्वतंत्र वनवृत्तिच्या घडी घडी सुखाते स्मरे ।

एकदा काय झाले, एका मैदानावर काही मुले निशाणबाजीची तालीम करीत होती. ते दृश्य पाहिले आणि रॉबिनला कसेसेच वाटू लागले.

तो एकदम मोठ्याने म्हणाला, "काय हे? ही पोरं नेम मारताहेत तितका तरी मला मारता येईल का आता? ....आणि म्हणे, तिरंदाज रॉबिन हुड!"

शेवटी त्याची खिन्नता इतकी वाढत गेली, की त्याने दूरदेशात प्रवास करायचे ठरवले. राजेसाहेबांकडे त्याने रजा मागितली. त्यांनी ती आनंदाने दिली आणि रॉबिन व मेरियन प्रवासाला निघाली.

अनेक चित्रविचित्र प्रदेश त्यांनी पाहिले आणि रॉबिनची कळी जरा खुलली. पण त्याला तो प्रवास लाभला नाही.

अशाच एका परक्या मुलुखात मेरियनला कसला तरी भयंकर आजार जडला आणि ती त्यातच मरण पावली.

रॉबिनवर आकाशच कोसळले. लग्नानंतर पाचच वर्षे त्यांनी एकत्र घालवली होती; मेरियनवाचून जगणे अशक्य आहे असे त्याला वाटले.

दुःखाने छाती दडपून गेली होती अशा स्थितीत रॉबिन लंडनला परतला. तेथे दुसरेच संकट वाढून ठेवले होते.

रिचर्ड राजा पुन्हा युद्धावर गेला होता आणि राजपुत्र जॉनकडे राज्यसूत्रे आली होती.

पूर्वीच्या दुप्पट जोमाने त्याने झोटिंगशाही सुरू केली होती. आपले जुने सूड उगवून घ्यायचा त्याने सपाटा लावला होता.

रॉबिन दरबारात गेला, तेव्हा जॉनने खदखदा हसून त्याचे स्वागत केले, "आलात तुम्ही? कशाला आलात? इथे काय तुमचं? तुम्ही आपले रानात जा. तिथेच राहा. राजाची हरणं मारा. म्हणजे राजा खुष होईल कदाचित नि तुम्हाला प्रधानकी देईल खाडदिशी!....

रॉबिनचे रक्त सळसळले.

जॉनने टोमणा दिला होता. पण रॉबिनने ते आव्हान म्हणून झेलले.

तो रागारागाने म्हणाला, "एकदा सोडून दहादा मारीन हरणं! आणि मग तुमचे पितर उतरले पाहिजेत मला पकडून आणायला!"

पण ह्याचा परिणाम वाईट झाला. शिपायांनी तेथल्या तेथेच त्याला पकडले आणि तुरुंगात टाकले.

त्या कैदेतून त्याची सुटका त्याच्या इमानी विली स्ट्यूटलीने केली. शरवुडच्या एकशेचाळीस गड्यांनी धडाधड आपल्या नोकऱ्यांचे राजीनामे दिले आणि स्वातंत्र्यापुढे श्रीमंती तुच्छ मानणारे ते स्वच्छंदी गडी पुन्हा शरवुडच्या अरण्यात एकत्र जमले.

पुन्हा एकवार शरवुडचे अरण्य त्यांच्या दमदार आरोळ्यांनी दणाणून गेले. पुन्हा एकवार रॉबिनच्या शिंगाचा ध्वनी झाडझाडोऱ्यांतून दुमदुमू लागला. पण ह्या खेपेला जॉनच्या शिपायांनी रॉबिनच्या टोळीचा अगदी पिच्छा पुरवला. सैन्यावर सैन्ये येऊन शरवुडचे रान पालथे घालू लागली.

शेवटी रॉबिनला ती जागा सोडून डर्बी परगण्यात दुसऱ्या एका जागी जावे लागले. ह्याही ठिकाणी आपल्या पुंडमित्रांनी सैन्याशी वर्षभर झुंज

दिली म्हणतात. त्यानंतर ह्या मंडळीचे काय झाले त्याची मात्र नीटशी माहिती मिळत नाही.

पण रॉबिनच्या मागे जाऊ या.

अशाच एका मोहिमेत रॉबिन जखमी झाला. जखम बरीच खोल होती आणि तिने त्याला पुरते हैराण केले.

रक्त वाहून वाहून रॉबिन खंगत चालला. पूर्वीची शक्ती त्याच्यात राहिली नाही.

एक दिवस तो घोड्यावर बसून चालला होता. कर्क्लेच्या मठाजवळ त्याला एकाएकी चक्कर आली आणि तो खोगिरावरून घसरून खाली पडला. कसेबसे त्याने स्वतःला सावरले आणि अडखळत ठेचाळत जाऊन देवळाचा दरवाजा ठोठावला.

काळा झगा पांघरलेली मठातली जोगीण दार उघडून बाहेर आली. तिने चटकन त्याला सावरून धरले, आत नेले आणि खाटेवर निजवले. ती म्हणाली, "रक्तस्राव झाला पाहिजे. तरच तुला बरं वाटेल...."

आणि असे म्हणून तिने चाकू घेऊन त्याची रक्तवाहिनी फाडली ....रॉबिनची शुद्ध गेली.

तो परत शुद्धीवर आला तोपर्यंत त्याच्या अंगातले घमेलेभर रक्त वाहून गेले होते. अंगात अजिबात त्राण उरले नव्हते.

कण्हत कुंथत त्याने बाईला हाक मारली. ती आली नाही. कोणीच आले नाही.

रॉबिन कुशीवर वळला तेव्हा खिडकीतून त्याला बाहेरचे हिरवे गार कुरण दिसले. त्याला कुरणावर जाऊन हरणाप्रमाणे बागडावे असे वाटले. पण त्याच्या अंगांत ताकद होती कोठे?

कंबरेचे शिंग काढून त्याने क्षीण आवाजात फुंकले. कोणालाही ते शिंग ऐकू गेले नसते. पण सुदैवाने धाकला जॉन जवळपास होता म्हणून

बरे झाले. तो धावतच आला.... आवाजाच्या दिशेने आला आणि देवळात शिरला.

कण्हत कुंथत असहाय स्थितीत पडलेला आपला पुढारी पाहून त्याला भडभडून आले. रक्ताने भरलेला त्याचा बिछाना पाहून जॉनचे प्राण कंठाशी आले.

रॉबिनच्या खाटेजवळ जाऊन जॉनने गुडघे टेकले आणि आवेगाने रॉबिनचे दोन्ही हात धरले.

"रॉबिन....रॉबिन! काय झालं?"

रॉबिनने अडखळत थोडक्यात काय झाले ते सांगितले.

रॉबिन...रॉबिन!" धाकला जॉन उद्वेगाने म्हणाला, "तुला त्या बाईने दगाफटका करून मारलंन खास!....चल. चल इथून. ह्या मठात क्षणभर राहू नकोस. आपण मठ जाळून टाकू या ....त्या डाकिणीला मारून टाकू या!...."

"त्या दोन्ही गोष्टी मी करणार नाही." रॉबिन क्षीण स्वरात पण निश्चयाने म्हणाला, "ज्याचं पाप त्याच्याजवळ. पण जॉन, मी आजपर्यंत बाईला कधी दुखावलं नाही. मरताना दुखवीन?"

रॉबिनने बोलता बोलता डोळे मिटले आणि तो कुशीवर वळला. पुन्हा डोळे उघडून आपल्या जिवलग मित्राकडे त्याने निःशक्त नजरेने पाहिले.

"जॉन!.... मला उचलून धर रे जरा...."

तो कापऱ्या आवाजात म्हणाला, "बाहेरच्या कुरणावरचा गार वास मला हवा आहे. गवताचा गोड वास मला हुंगायचा आहे. जॉन, जॉन.... माझं ध...नु...ष्य दे रे मला. बाण मारू दे. मला शेवटचा बाण मारू दे, जॉन!"

धाकल्या जॉनने रॉबिनचे आवडते धनुष्य उचलून त्याच्या हातात दिले, आपल्या हाताने बाण जोडून दिला व बगलेत हात घालून आपल्या लाडक्या मित्राला किंचित उठता केला....

रॉबिन म्हणाला, "जॉन, हा बाण पडेल ना, तिथेच मला पुरा हं! तिथेच.... त्याच जागी...."



म्हणता म्हणता धनुष्याची दोरी ढिली पडली होती. बाण सुटला होता. बाहेर जाऊन एका मोठ्या ओक वृक्षाखाली छायेत पडला होता. धाकला जॉन दांडगेला ओबडधोबड असामी. रडणे त्याला माहीत नव्हते. पण आज घळकन दोन मोठाले अश्रू त्याच्या डोळ्यांतून गळले आणि रॉबिनच्या हातावर पडले.

रॉबिन पुन्हा बिछान्यावर निपचित पडला होता. त्याचे धनुष्य अजूनही मुठीत कवटाळलेले होते. रॉबिन खुषीत दिसत होता.

धाकल्या जॉनला वाटले, झोपेत देखील रॉबिन किती सुखी दिसतो.... हसतमुख दिसतो. पण एकाएकी त्याला काय वाटले...

"रॉबिन....रॉबिन!" म्हणून त्याने त्याला गदगदा हलवले. मग आपला वेडेपणा त्याच्या लक्षात आला. त्याला समजून चुकले, की रॉबिन आता झोपेतून उठायचा नाही.

दोन्ही हातांनी त्याने आपले तोंड झाकून घेतले आणि एखाद्या लहान मुलासारखा तो ढसढसा रडायला लागला. ज्या जागेवर रॉबिनचा शेवटचा तीर पडला होता, त्याच जागी त्याच्या शूर सोबत्यांनी त्याची समाधी बांधली. मोठीशी भव्य आणि सुंदर नव्हती ती. छोटीशीच आणि ओबडधोबड. पण रॉबिनच्या मित्रांना ते एक यात्रेचे ठिकाण वाटे.

त्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत आसपासचे लोक त्या ठिकाणी एक लहानसा दगड दाखवीत. नीट निरखून पाहाणारांना दगडावरची ओबडधोबड अक्षरे पण वाचता येत –

